# प्रस्तावना



सुमारें अडीच वर्षांपूर्वी 'मास्टर ऑफ एज्युकेशन' या नवप्रस्थापित पदवीकरितां मुंबई विद्यापीठानें मान्य केलेला हा पहिला निबंध इंग्रजींत लिहिलेला होता. गेल्या मार्च महिन्यामध्यें हा निबंध पुस्तक-रूपानें प्रसिद्ध करण्याकरितां आर्थिक मदत देण्याची तयारी मुंबई विद्यापीठानें दर्शविली व त्यामुळें मी हा निबंध प्रांथिक स्वरूपांत प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. प्रस्तुत निबंधाचा व शब्दावल्यांचा खरा उपयोग प्राथमिक शाळांत काम करणाऱ्या शिक्षकांनाच होणार असल्यामुळें हा निबंध इंग्रजींत प्रसिद्ध न करतां त्याचें मराठींत रूपांतर करून तो प्रसिद्ध करावा असें मनाशीं ठरवून तसें करण्याबद्दल विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांची परवानगी मिळविली. मूळ निबंधाचें शब्दशः भाषान्तर न करतां, तज्ज्ञ परीक्षकांच्या मतानुसार किरकोळ बदल करून मूळ इंग्रजी निबंधाचें मराठींत रूपांतर करण्याचें ठरवून आज तें प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

गेल्या दोन-अडीच वर्षांत निरनिराळ्या ठिकाणच्या शिक्षणप्रेमी गृहस्थांकडून व त्याचप्रमाणे बी. टी. पदवीधर शिक्षकांकडून प्रस्तुत निबंधाच्या स्वरूपाविषयीं व संशोधन-पद्धतीविषयीं अनेकदां विचारणा करण्यांत आली. परंतु त्या सर्वांना मामुली स्वरूपाचें उत्तर पाठविण्याखेरीज मला जास्त माहिती देतां आली नाहीं; कारण निबंधाची हस्तलिखित प्रत प्रत्येकाकडे पाठविणें अशक्य होतें. आतां तो निबंध पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत असल्यामुळें अशा कार्याविषयीं जिज्ञासु असणाऱ्या गृहस्थांना मी केलेल्या या शैक्षणिक संशोधनकार्याची कल्पना येऊं शकेल.

प्रस्तुत निबंधाचा विषय 'मुंबई शहरांतील पांच ते नऊ वर्षें वयाच्या बालविद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तीची वयोवार वाढ' असा आहे. या संशोधनाची समग्र हकीकत, त्याच्या मार्गातील अडचणी व त्याचें मर्यादित स्वरूप यांचें सविस्तर निरूपण निबंधांत केलेलें असल्यामुळें या ठिकाणीं त्याचा पुनरुच्चार करण्याचें प्रयो-

जन नाहीं. या संशोधनाची फलनिष्पत्ति म्हणून ज्या शब्दावल्या तयार केलेल्या आहेत त्यांमध्यें क्वचित् असें दिसून येण्याचा संभव आहे कीं, कांहीं अगदीं सोपे दिसणारे शब्द जास्त वयाच्या शब्दावल्यांत दिसतील, तर कांहीं कठीण दिसणारे शब्दहि लहान वयाच्या शब्दावल्यांत दिसतील. तसेंच कांहीं अपेक्षित असणारे शब्द मुळींच दिसून येणार नाहींत. या सर्व गोष्टी दिसून येण्याचें एक मुख्य कारण असें आहे कीं शब्दावल्यांतील शब्द ठरवितांना पुढारलेले, मध्यम व मागसलेले अशा सर्व तऱ्हेच्या विद्यार्थ्यांची शब्दसंग्रहासंबंधी परीक्षा घेऊन व त्यांचीं उत्तरें एकत्र करून नंतरच कोणत्या शब्दांचा समावेश व्हावा व कोणत्या शब्दांचा होऊं नये हें ठरविलेलें आहे, व त्यामुळें वरील तऱ्हेच्या मतभेदाला वाव राहणें शक्य आहे.

प्रस्तुत संशोधनाची व्याप्ति मुंबई शहरापुरती असली, तरी संशोधनानुसार तयार केलेल्या शब्दावल्या या कोणत्याहि ठिकाणच्या मराठी भाषा शिकणाऱ्या बालविद्यार्थ्यांची शब्दसंपत्ति अजमावण्यासाठीं उपयोगी पडतील, यांत संशय नाहीं. तसेंच, या वयोवार शब्दावल्यांचा उपयोग प्राथमिक शाळांकरितां पुस्तकें लिहिणाऱ्या लेखकांना व प्राथमिक शाळांत काम करणाऱ्या शिक्षकांना कसा होऊं शकेल, याचें सविस्तर विवेचन पुस्तकांत करण्यांत आलेलें आहे. या देशांत शैक्षणिक संशोधन अद्याप प्राथमिक अवस्थेंत असलें, तरी अलिकडे शैक्षणिक प्रश्नांकडे संशोधनात्मक दृष्टीनें पाहण्याची प्रवृत्ति जास्त प्रमाणांत वाढत असल्याचें दिसून येत आहे. प्रस्तुत संशोधन-प्रयत्न या तऱ्हेचा पहिलाच असल्यामुळें वाचकवर्ग तशा दृष्टीनेंच त्याकडे पाहील अशी आशा आहे.

या प्रस्तावनेच्या निमित्तानें ज्या ज्या लोकांचें मला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष साहाय्य झालें त्यांच्याबद्दल वाटणारी कृतज्ञता प्रकट करण्याची संधि मी घेत आहें. अगदीं प्रथमतःच व प्रामुख्यानें मि. एस्. एस्. कॅमेरॉन, माजी प्रिन्सिपल, से. ट्रे. कॉ. मुंबई, यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें माझें कर्तव्य आहे; कारण त्यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं काम करण्यास सुरुवात केल्यापासून निबंध लिहून तो मुंबई विद्यापीठाकडे सादर करीपर्यंत त्यांनी सहानुभूतिपूर्वक मोठ्या कळकळीनें व योग्य तऱ्हेनें मार्गदर्शन केलें व मधून मधून खचणारा माझा उत्साह कायम टिकविण्याच

मदत केल्यामुळेंच मला हा निबंध इतर सर्व नित्य कामें संभाळून यशस्वी रीतीनें पुरा करतां आला; म्हणून त्यांचे कितीहि आभार मानले, तरी ते थोडेच होतील यांत संशय नाहीं.

त्याचप्रमाणें, मुंबई से. ट्रे. कॉलेजचे प्रि. हॅम्पटन, प्रो. मिस्. पार्णदीकर व प्रो. डॉ. व्ही. व्ही. कामत यांनीं वेळोवेळीं केलेल्या उपयुक्त सूचनांबद्दल व मदतीबद्दल आणि मुंबई म्यु. स्कूल्स कमिटीचे माजी सेक्रेटरी प्रो. रा. वि. परुळेकर, सुपरिंटेंडेंट श्री. ना. गं. लिमये, निरनिराळ्या म्यु. मराठी शाळांचे मुख्याध्यापक व त्यांचे सहकारी शिक्षक यांनीं म्युनिसिपल शाळांतील विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्याच्या कामीं दिलेल्या सवलतीबद्दल व साहाय्याबद्दल या सर्वांचा या ठिकाणीं कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें अवश्य आहे. तसेंच, या पुस्तकाचें लेखन-प्रकाशन कार्य सुलभ होण्याच्या कामीं ज्यांनीं ज्यांनीं मदत केली त्यांचाहि मी फार आभारी आहें.

शेवटीं, 'प्रस्तुत पुस्तकाच्या प्रसिद्धीकरणाच्या खर्चाकरितां मुंबई विद्यापीठानें दिलेल्या भरीव आर्थिक मदतीबद्दल मुंबई विद्यापीठाचा मी अत्यंत ऋणी आहें' एवढें सांगून हें निवेदन पुरें करतों.

बेळगांव, ऑगस्ट १९४१. } स. रा. भट

# अनुक्रमणिका

# बालविद्यार्थ्यांची
# मराठी शब्दसंपत्ति



## प्रकरण पहिलें

## भाषाध्ययनांत शब्दसंपत्तीचें स्थान

**स्वभाषेचें महत्त्व :**— प्रत्येक मनुष्यप्राण्याच्या जीवनांत जें महत्त्व स्वदेश व स्वधर्म यांना आहे, तेंच महत्त्व स्वभाषेला आहे. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, स्वधर्म व स्वदेश यांपेक्षां स्वभाषेचें महत्त्व कांकणभर जास्त आहे. कारण मनुष्याला आपला देश अथवा धर्म यांचें कार्य करावयाचें झाल्यास, त्याला तें आपल्या भाषेच्या द्वाराच करावें लागेल. बालविद्यार्थ्यांच्या शालेय शिक्षणा-संबंधीं विचार केल्यास हीच गोष्ट दिसून येईल. शाळेमध्यें विद्यार्थ्यांना भाषा-विषयाबरोबरच गणित, इतिहास, भूगोल, शास्त्रीय विषय इत्यादि विविध प्रकारचें ज्ञान मिळत असलें, तरी त्या सर्व ज्ञानाचा पाया भाषाविषयच होय. कारण

भाषाविषयाचा आधार घेतल्याशिवाय इतर कोणत्याहि विषयाचें ज्ञान देणें शक्य होणार नाहीं. म्हणून शालेय शिक्षणामध्यें सर्वांत महत्त्वाचा व इतर सर्व प्रकारच्या ज्ञानाला आधारभूत असा जर कोणता विषय असेल, तर तो भाषाविषय होय. म्हणून मनुष्यप्राणी भाषाज्ञान कसें संपादन करतो, त्या भाषाज्ञानाचा उपयोग कसा करतो व त्या भाषाज्ञानाचें मुख्य अंग कोणतें यासंबंधी प्रस्तुत प्रकरणांत विचार केला पाहिजे.

**भाषा म्हणजे काय ? :–** मनुष्यप्राणी स्वभाषेचें ज्ञान जन्मापासूनच हळूहळू आत्मसात् करीत असतो व ही क्रिया आमरण चालू राहते. तो एकाएकीं भाषाज्ञानानें संपन्न होत नाहीं. शब्दकोशांमध्यें 'भाषा' शब्दाचा अर्थ '*विचार किंवा भावना प्रकट करण्याचा एक मार्ग*' असा दिलेला आढळतो. *परंतु भाषा म्हणजे केवळ विचार व भावना यांचें प्रकटीकरण नव्हे, तर भाषा हे विचार करण्याचें व भावनांचा अनुभव घेण्याचें एक साधन आहे. कारण मनुष्याला भाषेच्या साहाय्यानें दुसऱ्याच्या भावनांशीं सहानुभूति दर्शवितां येते. त्याचप्रमाणें शब्द हे विचारक्रियेचे आवश्यक घटक असून मनुष्य एखाद्या प्रसंगाच्या परिणामाबद्दल जास्त विचार करण्याचा जसजसा प्रयत्न करूं लागतो, तसतसें त्याच्या विचारांना शब्दांचें मूर्त व निश्चित स्वरूप येतें. विचार्य-विषय ज्या मानानें भावनात्मक व दुर्बोध असेल, त्या मानानेंच विचार करणारा मनुष्य शब्दांची निवड काळजीपूर्वक करूं लागतो व त्याचप्रमाणें शब्दांच्या अर्थांची चिकित्सा काटेतोलपणानें करण्यास प्रवृत्त होतो. एच. जी. वेल्स या ग्रंथकारानें असें म्हटलें आहे कीं, 'रेखाचित्रें, लहानलहान नमुने, चिन्हें व आकृति यांच्या द्वारा मनुष्यप्राणी कागदावर वस्तूंबद्दल कल्पना करून घेतो. परंतु विचारक्रियेची रूढ पद्धति अथवा राजमार्ग भाषा हा होय'.

विचारप्रकटीकरणाचें एक साधन अशी 'भाषा' शब्दाची व्याख्या कधीं कधीं केलेली आढळते खरी, परंतु या व्याख्येनें भाषा शब्दाच्या अर्थांची कल्पना पूर्णत्वानें येत नाहीं. कारण प्रौढ मनुष्य भाषेचा उपयोग निरनिराळ्या कामांकरितां

* 'Language in Education' by Michael West – page 2.

करीत असतो. उदाहरणार्थ :–कोणतीहि गोष्ट ठासून सांगणें, सार्वत्रिक अनुभवाऱ्या गोष्टी सांगणें, माहिती पोचवणें, आज्ञा करणें, इच्छा प्रदर्शित करणें, टीका करणें, भावना उत्तेजित करणें अथवा दुसऱ्यास कार्यप्रवृत्त करणें, इ.

**लहान मुलांच्या भाषेचें स्वरूप :–** लहानमुलेंसुद्धां केवळ विचारनिवेदनाकरितांच भाषेचा उपयोग करण्याला प्रवृत्त होत नाहींत, तर तीं अन्य कारणांनींहि भाषेचा उपयोग करण्याला प्रवृत्त होतात. लहान मुलांच्या भाषणाचें स्वरूप दोन प्रकारचें असतें – (१)* आत्मकेंद्रित (ego-centric) म्हणजे स्वतःशींच स्वतः बोलणें व (२) परसापेक्ष (socialized) म्हणजे स्वतःच दुसऱ्याला उद्देशून बोलणें. ज्या वेळीं मूल पहिल्या प्रकारचे शब्द बोलतें त्या वेळीं आपण कोणाशीं बोलत आहों याची पर्वा तें करीत नाहीं. तें स्वतःकरितां तरी बोलत असतें, किंवा सहजगत्या जवळच वावरणाऱ्या मनुष्याचा संबंध स्वतः करीत असलेल्या क्रियेशीं आणून बोलत असतें; मात्र या वेळीं तें ऐकणाऱ्याचें मत जाणण्याचा प्रयत्न मुळींच करीत नाहीं. अशा वेळीं ऐकणाराचें वरवर लक्ष असलें म्हणजे तें मूल आपली अशी समजूत करून घेतें कीं, आपलें बोलणें दुसरा जवळचा मनुष्य ऐकत आहे व समजूनहि घेत आहे. ऐकणाऱ्याच्या मनावर छाप बसवावी किंवा त्याला कांहीं मुद्दाम सांगावें असा त्याचा मुळींच हेतु नसतो. दुसऱ्या प्रकारचें बोलणें पुढील तऱ्हेचें असतें. मूल दुसऱ्याला आपलें म्हणणें ऐकवतें व त्याच्यावर परिणाम होईल अशा युक्तीनें बोलतें, म्हणजे ऐकणाराची जाणीव मनांत बाळगूनच मूल बोलत असतें. तें दुसऱ्याच्या कार्यासंबंधीं किंवा वागणुकीसंबंधीं टीकात्मक वाक्यें बोलण्याचा प्रयत्न करतें व असें करतांना तें आपली स्वतःची श्रेष्ठ भूमिका प्रस्थापित करतें व इतरांना त्या मानानें कमी लेखतें. तसेंच, तें आजूबाजूच्या लोकांनाःहुकूम करतें अथवा कधीं कधीं त्यांची विनवणी करतें, तर कधीं कधीं धमकीवजा शब्द उच्चारतें. याशिवाय प्रश्नोत्तरांचा प्रकार मुलांच्या बोलण्यांत नेहमींच चालू असतो.

**लहान मुलांच्या बोलण्याचीं उदाहरणें :–** लहान मुलांच्या वरील सर्व

* 'Language and Thought of the Child' by Piaget; page 9.

प्रकारच्या बोलण्याची कल्पना एका लहान मुलाच्या पुढील उदाहरणावरून नीट येऊं शकेल. ज्या वेळीं लहान मूल सहज स्फूर्तीनें अथवा अनुकरणानें निरनिराळे आवाज तोंडांतून काढूं लागतें, तेव्हां तेच तेच ध्वनि पुनः पुनः उच्चारण्यांत त्या ध्वनींवर स्वामित्व मिळाल्याचा त्याला आनंद होत असतो. '*दादा – काका – मामा – बाबा*' यांसारखे व्यक्तिनिदर्शक शब्द व '*दुदू – मम्मं – काऊ*' यांसारखे नित्य परिचयांतील वस्तु दर्शविणारे शब्द त्याला उच्चारतां येऊं लागले, म्हणजे तेच तेच शब्द पुनः पुनः उच्चारण्यांत त्याला आनंद वाटूं लागतो. मुलांची शब्दसंपत्ति हळूहळू वाढत जाते व वाक्यरूपानें विचार प्रकट करण्याची शक्ति त्याला प्राप्त होऊं लागते. या वेळीं स्वतःशींच आपले विचार मोठ्यानें प्रकट करण्याची संवय त्याला लागते. एखादी क्रिया करतांना तें स्वतःशींच बोलत असतें व क्रिया आणि शब्दोच्चार एकदम होत असतो. खेळतांना तें आपल्याच नादांत असतें व आपल्याशींच मोठ्यानें बडबडत असतें. '*या घोल्याला आतां बांदून थेवायचं – अन् ही हम्मा कुथं थेवावी बलं? – माऊ कशी छान आहे*' अशा तऱ्हेची किंवा '*आतां पंप येनाल – अन् मग आमी पुक्कल पुक्कल लांब जानाल – तिथं खाऊ घेनाल – तुला नाहीं न्यायचं बलोबल*' अशी आपल्या बाहुलीला उद्देशून चाललेली बडबड ही मोठ्यानें केलेल्या आत्मगत भाषणाचाच एक प्रकार म्हणतां येईल. पुष्कळ वेळेला मुलांची अशा तऱ्हेची बडबड *मोठी मंडळी आजूबाजूला असतांना त्यांना उद्देशून परंतु त्यांच्या उत्तराची पर्वा* न करतां किंवा त्यांचें लक्ष आपल्याकडे आहे कीं नाहीं याची क्षिति न बाळगतां चालूच असते. '*मी पुण्याला मामाकले जानाल हं – दादा, तूं येनाल पुन्याला – ताईला नाही न्यायचं हं – वाइत्त आहे ताई फाल – आईला न्यायचं – काकांना न्यायचं – छगल्या – छगल्यांना न्यायचं – मग झुकझुक गाडी येईल नि मग मी* खिडकींत बसनाल हं – आनि मामीकले गेल्यावल पुक्कल पुक्कल खाऊ खानाल –' *अशा तऱ्हेच्या बडबडीकडे वडील माणसांचें लक्ष आहे कीं नाहीं*, किंवा त्यांच्या-कडून उत्तरें मिळतात कीं नाहींत याची मुलांना मुळींच दखलगिरी नसते. त्यांची *गाडी आपली स्वतःच्या तन्द्रींत चालूच असते.*

यानंतरच्या मुलांच्या भाषाविकासांत पुष्कळ सुधारणा दिसून येते. स्वतःचे

विचार शब्दरूपानें बोलून दाखवण्यांत वाटणारा आनंद हाच अद्यापपावेतों मुख्य होता. पण आतां आपले विचार दुसऱ्यांनीं ऐकावेत, त्यांचे विचार आपल्याला कळावेत ही विचारविनिमयाची तीव्र इच्छा त्यांच्या मनांत जागृत झालेली दिसून येते. आजूबाजूला दिसणाऱ्या विविध गोष्टींविषयीं वाटणारी जिज्ञासा व ती तृप्त करून घेण्याची इच्छा हिनेंहि थोडाफार अंतःकरणांत प्रादुर्भाव केलेला असतो. त्यामुळें 'मला पंपंमध्यें बसायचय् – कुयें गेली पंपं – केवा येनाल ती' अशा तऱ्हेचे किंवा 'मी खूप खूप जमतींत गेलों होतों – तिथं मोथ्था मोथ्था बुवा होता – अन् मग बाप्पा तिथं आला – त्यानं बुवाला खूप खूप मालल – मग लागला ललायला' अशा तऱ्हेचें पाहिलेल्या सिनेमाचें वर्णन करतांना आपले विचार दुसऱ्यांनीं ऐकावेत अशी त्याची इच्छा असते. त्याची जिज्ञासा इतकी तीव्र असते कीं 'हें काय, तें काय, याला काय म्हणतात, याचं नांव काय' अशांसारखे प्रश्न विचारल्यावांचून त्याला स्वस्थ बसवत नाहीं. याच सुमारास इतर लोकांविषयीं आपलीं मतें आजूबाजूच्या लोकांना ऐकविण्याचीहि तीव्र इच्छा बालमनांत असते. 'काका फाल फाल छान आहेत – बाबी वाइत्त आहे – काऊ देत नाहीं – तिला योक यायचा – पंपंमध्यें नाहीं न्यायचं तिला – मला नाहीं आवलत ती' अशा तऱ्हेचीं आपलीं अजाणपणें बनलेलीं इतर लोकांविषयींचीं मतें इतरांना ऐकविण्यास मूल कमी करीत नाहीं. आज्ञा – विनवण्या – धमकी – प्रश्नोत्तरें इत्यादिकांचाहि भरणा लहान मुलांच्या भाषणांत दिसून येतो. 'मला पंपं पाहिजे – मला दुद्दू पाहिजे – मला उचलून घ्या – चित्रांचें पुस्तक आणून द्या' इत्यादि वाक्यांच्या द्वारा घरांतील माणसांना मूल हुकूम सोडीत असतें. ज्या वेळीं आपल्या हुकमाचा कांही उपयोग होत नाहीं असें त्याला आढळतें त्या वेळीं त्याच्या विनंत्या सुरू होतात. 'आई, दे ना ग मला पुस्तक, मी कुन्नाला कुन्नालाहि दाखवनाल नाहीं – दाखव ना मला चित्त – छान छान आहे तें' अशा तऱ्हेच्या विनवण्यांनीं ज्या वेळेला काम साधेलसें दिसत नाहीं त्या वेळीं मग 'मला काऊ देतोस का नाहीं – का मी बाबाला सांगूं; थांब ताइटले, मला भावली तल देऊं नकोस – मी काकांनाच सांगेन; पुस्तक देतोस का मालूं तुला' अशा तऱ्हेच्या धमक्यांना बहर येतो. प्रश्न विचारणें व त्यांचीं उत्तरें मिळवणें

अथवा विचारलेल्या प्रश्नांची उत्तरें देणें हे लहान मुलाच्या बोलण्याचे प्रकार तर एकसारखे सुरूच असतात.

* भाषेचें द्विविध स्वरूप :–भाषेचे मुख्यतः दोन विभाग पडतात – आविष्करण व ग्रहण. आविष्करण दोन प्रकारांनीं घडतें – तोंडानें व लेखनानें. या प्रत्येक प्रकाराचे पुन्हा दोन भाग पडतात – निवेदन व स्वसमाधानार्थ भाषण अथवा लेखन. कारण मनुष्य दुसऱ्याशीं विचारविनिमय करण्याकरितांच भाषण व लेखन करतो असें नाहीं; तर आपलें बरेंचसें भाषण व लेखन दुसऱ्यांनीं ऐकावें अथवा वाचावें म्हणून नसतें – तें केवळ आत्मसमाधानाकरितांच असतें. ग्रहण हेंहि दोन प्रकारांनीं घडतें – श्रवण व वाचन.




मूल भाषा कशी शिकतें ! भाषा म्हणजे काय याविषयीं सामान्य कल्पना वर देण्यांत आली असल्यामुळें, आतां मूल भाषा कशी शिकतें याविषयीं विचार करणें आवश्यक आहे. मुलाला बोलण्याची शक्ति प्राप्त झाल्या क्षणापासून त्याच्या भाषाशिक्षणाला प्रारंभ होतो व हें जन्मभाषेचें शिक्षण आजीव चालू असतें. मूल आपल्या सभोंवतालच्या वातावरणांतून व आजूबाजूस व्यवहार करणाऱ्या मनुष्यांपासून कांहीं शब्द उचलतें. या वेळीं तें शब्दाचा उच्चार

* 'Language in Education' by Michael West – pages 3 & 4.

व त्यानें दर्शविलेली वस्तु किंवा क्रिया यांची मनामध्यें सांगड घालतें, व पुनः संधि आली म्हणजे तो शब्द अचूक उच्चारतें; अशा रीतीनें मूल आपला शब्द-संग्रह वाढवीत असतें. अशा शब्दांतील प्रत्येक शब्द पूर्णकल्पनानिदर्शक असतो. मूल हळूहळू आजूबाजूच्या प्रौढ मंडळींच्या अनुकरणानें पूर्ण वाक्यें बोलूं लागतें. मुलें शब्दांचा उच्चार श्रवणद्वारा शिकतात, परंतु शब्दांचा निश्चित अर्थ, त्यांना निवड, तुलना व तर्क या तीन नैसर्गिक साधनांच्या जोरावर आपोआप समजून येत असतो. मूल शिशु-अवस्थेंत जे शब्द ऐकतें ते पुनः पुनः उच्चारतांना लोकांच्या वर्णोच्चाराचें व आवाजाचें अनुकरण करणें त्याला फार आवडत असतें. अशा रीतीनें तें आपलें शब्दज्ञान दृढ करीत असतें व त्या वेळीं शब्दांचा अर्थ नीट समजतो कीं नाहीं याकडे त्याचें विशेष लक्ष असत नाहीं.

*'मनुष्याच्या मनाचा असा एक साधारण धर्म आहे कीं तें अपरिपक्व अवस्थेंत असूनसुद्धां शब्दांचा केवळ पुनरुच्चार करून थांबत नाहीं तर तें घटनात्मक कार्य करीत राहतें. वरवर दिसणाऱ्या मनोव्यापारांच्या आंत एक अज्ञात शक्ति जागृत असते व तिच्या साहाय्यानें वयोवाढीबरोबरच मूल आपल्या शब्द-संग्रहांत नवीन शब्दांची भर घालीत असतें, व त्या शब्दांचा उपयोग वाक्यांमध्यें योग्य स्वरूपांत करीत असतें. म्हणजेच नामाचा उपयोग करतांना त्याचा योग्य वचनांत उपयोग करतें, त्याचप्रमाणें क्रियापदाचा उपयोग करतांना त्याचें योग्य काळाचें रूप योजतें, वाक्यांतील शब्दांचा क्रम बिनचूक असतो व वाक्याची रचनाहि निर्दोष असते.'

*शब्दज्ञानाचें महत्त्व :*— *मूल भाषा कशी शिकतें यासंबंधी केलेल्या वरील* विवेचनावरून हें लक्षांत आलें असेल कीं भाषाज्ञानाचा पाया शब्दज्ञान असून शब्दसंपत्तीवर भाषेचीं सर्व अंगें-उपांगें आधारलेलीं आहेत. म्हणूनच, तोंडी व लेखी भाषाविष्करण, अर्थग्रहणपूर्वक वाचन, शुद्धलेखन, व्याकरण व निबंधलेखन या सर्वांचा पाया म्हणजे शब्दज्ञान होय. याकरितां, मुलांच्या बाल्यावस्थेंतील

* 'Teaching of the Mother-Tongue' by Ballard-Chapter V.

शब्दसंग्रहाच्या मर्यादेचें निश्चित ज्ञान मिळवितां आल्यास तें भाषाशिक्षणाच्या दृष्टीनें उपकारक होईल. गेल्या चाळीस वर्षांत पाश्चिमात्य देशांतील थॉर्नडाइक, सिरिल बर्ट, गेट्स इत्यादि शिक्षणशास्त्रविशारदांनीं या दिशेनें केलेलें संशोधन महशूर आहे. त्यांचे प्रयत्न आरंभीं जरी अपुरे भासले तरी त्यांनीं संशोधनपूर्वक काढलेल्या निष्कर्षांना इतर संशोधकांच्या कार्यानें निश्चित स्वरूप प्राप्त झालें असून सध्या इंग्रजी भाषेसंबंधीं प्रमाणभूत व विश्वासार्ह अशा शब्दावल्या ( word-lists ) तयार झाल्या आहेत.

वर दर्शविल्याप्रमाणें शब्दज्ञान हें मुखवाचन, मनोवाचन, भाषण व लेखन यांना फार उपयोगी आहे.* वाचनाच्या तंत्राचा तो एक आवश्यक भाग असून वाचकाचें शब्दज्ञानावर प्रभुत्व नसेल तर त्याची वाचनांतील प्रगति अत्यंत मंद होईल.§ वाचनक्षमतेची वाढ पुढील गोष्टींच्या क्रमानुसार होत असते :– ( १ ) शब्दांची ओळख, ( २ ) युक्तार्थज्ञान, ( ३ ) शब्दांची जुळवणी, ( ४ ) शब्दांच्या गटांची योग्य रचना व ( ५ ) वर वर वाचून अर्थग्रहण. यामुळें वाचनक्रियेमध्यें उत्तम प्रतीचें सौकर्य साधण्यासाठीं शिक्षकांनीं मुलांना शब्दांचा निश्चित अर्थ व योग्य उपयोग शिकविला पाहिजे. त्याचप्रमाणें, मुलांच्या शब्दसंपत्तीची स्थूल कल्पना, शब्दांचा योग्य उपयोग करण्याची मुलांची पात्रता, व नवीन शब्द समजून घेऊन त्यांचा योग्य उपयोग करण्याच्या शक्तींतील वाढ या गोष्टी शिक्षकांनीं समजून घेणें आवश्यक आहे. या कामाकरितां शब्दज्ञानाची परीक्षा करण्याच्या नव्या पद्धति फार उपयुक्त होतील.

मुलांच्या शब्दसंग्रहाचें स्वरूप :– प्राथमिक शाळेंतील पहिल्या दोन वर्षांमध्यें मुलांनीं बोलण्याचेच प्रसंग पुष्कळ येतील व पुढील तीन वर्षांमध्यें बोलण्याचे व तसेच वाचण्यालिहिण्याचेहि पुष्कळ प्रसंग येतील. या दृष्टीनें, विद्यार्थ्यांच्या शब्दसंग्रहाचें बोलण्यांत योजलें जाणारें व लिहिण्यावाचण्यांत दिसून येणारें असें जरी द्विविध रूप असलें तरी त्या दोहोंमध्यें निश्चित अशी भेददर्शक रेषा काढतां येणार

* 'How to measure' by Wilson and Hoke – page 142.

§ 'Language in Education' by Michael West – page 70.

नाहीं, कारण पुष्कळसे शब्द जसे बोलण्यांत तसेच लिहिण्यावाचण्यांतहि येत असतात.

अशा तऱ्हेनें मुलांच्या शब्दसंग्रहाचें स्वरूप कसें असेल याचें दिग्दर्शन केल्यानंतर पाश्चिमात्य संशोधकांनी तयार केलेल्या शब्दावल्यांचें स्वरूप काय आहे हें पाहणें आवश्यक आहे, कारण या कामांत तेच अग्रेसर आहेत. थॉर्नडाइक, हॉर्न, गेट्स इत्यादि शिक्षणशास्त्रविशारदांनीं निश्चित केलेल्या शब्दावल्या विशिष्ट हेतूनें निवड केलेल्या लिखाणांतील शब्दांच्या उपयोगसातत्यावर ( word-frequency ) आधारलेल्या आहेत. थॉर्नडाइक यांची दहा हजार इंग्रजी शब्दांची यादी सुप्रसिद्ध आहे. ती एकेचाळीस निरनिराळ्या प्रकारच्या वाङ्मयग्रंथांतील साडेचेचाळीस लाख शब्दांची मोजणी करून, त्यांत दिसून आलेल्या उपयोगसातत्याच्या क्रमावर आधारलेली आहे. त्या एकेचाळीस प्रकारच्या पुस्तकांमध्यें पुढील तऱ्हांच्या वाङ्मयाचा समावेश झालेला आहे :– बाल वाङ्मय, बायबल व इतर अभिजात ग्रंथराज, प्राथमिक पाठ्य पुस्तकें, पाकनिष्पत्ति, शिवणकाम, शेतकी, व्यापार व यांसारख्या इतर धंद्यांवरील पुस्तकें, दैनिक वर्तमानपत्रें व इतर पत्रव्यवहार. थॉर्नडाइक यांच्या उपरिनिर्दिष्ट शब्दसंग्रहाशिवाय विवक्षित विषयानुरोधी अशा दुसऱ्या शब्दावल्याहि उपलब्ध आहेत :– एल्ड्रिज – वृत्तपत्रांतील शब्दावलि, आयरिस – व्यापारविषयक पत्रव्यवहारांतील शब्दावलि, प्रेसी – शास्त्रीय ग्रंथांतील शब्दावलि. ड्यूई ह्या शिक्षणशास्त्रज्ञाच्या शब्दावल्याहि उपयुक्त म्हणून समजण्यांत येतात व त्या वीस प्रकारच्या ग्रंथांतील शब्दांवर आधारलेल्या आहेत. हॉर्न यांची सामाजिक व्यवहारांतील दहा हजार शब्दांची यादी प्रौढ लोकांच्या पत्रव्यवहारावर मुख्यतः आधारलेली आहे. शब्दावल्यांच्या वरील वर्णनावरून असें दिसून येईल कीं, त्यांचा उपयोग प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांपेक्षां सर्वसाधारण पुस्तक-लेखकांस जास्त होण्यासारखा आहे.

**प्राथमिक इयत्तांकरितां गेट्स यांनी तयार केलेला वाचनोपयोगी शब्दसंग्रह :–** या संग्रहांतील शब्दांची निवड पुढील विविध प्रकारच्या सामग्री

तून केलेली आहे :— थॉर्नडाइक यांचा शब्दसंग्रह, बालवाङ्मय, प्राथमिक शाळांचीं पाठ्य पुस्तकें, बालोपयोगी वाङ्मयाचीं विविध परिक्षणें, लहान मुलांच्या बोलींतील शब्दसंग्रह, आणि पुरवणी-वाचनपुस्तकें, कथापुस्तकें वगैरे. शब्दांची निवड पुढील दृष्टींनीं केलेली आहे :—

* ( १ ) शिक्षणतज्ज्ञांच्या मताप्रमाणें लहान मुलांना आवडतील असे शब्द, ( २ ) तज्ज्ञमतानुसार मुलांना उपयुक्त होतील असे शब्द, ( ३ ) प्रातिनिधिक स्वरूपाच्या प्राथमिक इयत्तांकरितां लिहिलेल्या पुस्तकांतून जास्त उपयोग केलेले शब्द, व ( ४ ) मुलांच्या बोलण्यांत पुनः पुनः दिसून येणारे शब्द. गेट्स यांच्या शब्दावलींतील शब्दांचा उपयोग बोलण्यांत केला जातो, हे शब्द प्राथमिक स्वरूपाच्या वाङ्मयांतहि दिसून येतात आणि त्यांचा संबंध लहान मुलांच्या आयुष्यांतील उपयुक्त व मनोरम अशा गोष्टींशींहि असतो. शिवाय भावी आयुष्यांतील वाचनांतहि हे शब्द दिसून येतात. अशा प्रकारचे हे शब्द असल्यामुळें मुलांना ते शिकण्याला व स्मृतींत ठेवण्याला सोपे जातात. वरील सर्व गोष्टींवरून असें दिसून येईल कीं, गेट्स यांचा शब्दसंग्रह थॉर्नडाइक व इतर संशोधक यांच्या शब्दसंग्रहांपेक्षां लहान मुलांच्या दृष्टीनें जास्त उपयुक्त झाला आहे.

**वयोमानानुसार बालविद्यार्थ्यांचा शब्दसंग्रह जाणण्याची आवश्यकता** :— बालविद्यार्थ्यांच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें उपरिनिर्दिष्ट उपयोगसातत्यावर आधारलेल्या शब्दावल्यांचें क्षेत्र संकुचित असल्यामुळें, दुसऱ्या एखाद्या तऱ्हेनें जास्त उपयुक्त अशा शब्दावल्या करतां येतील कीं काय हें पाहणें आवश्यक आहे. प्राथमिक शाळेंतील पहिल्या दोन वर्षांत मुलें भाषेचा पुष्कळसा उपयोग बोलण्यांत करतात आणि निरनिराळीं पुस्तकें वाचतांना व तसेंच घरीं व क्रीडांगणावर वावरतांना आपल्या शब्दसंपत्तींत भर घालीत असतात. म्हणून वर्षावर्षाला बालविद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तींत कसकशी वाढ होत जाते हें समजणें फार महत्त्वाचें आहे. पांच ते नऊ वर्षांच्या मुलांची शब्दसंपत्ति संभाषणात्मक व

* 'A Reading Vocabulary for the Primary Grades' by Gates, Introduction.

वाचनलेखनात्मक अशा दोनहि स्वरूपांची असली, तरी त्यांत संभाषणात्मक भागच जास्त असणार. म्हणून उपयोगसातत्यावर आधारलेल्या शब्दांच्या याद्या किंवा वाचनोपयोगी शब्दांच्या याद्या ह्या एकांगी स्वरूपाच्या असल्यामुळें मुलांना सामान्यतः ज्या शब्दांचें ज्ञान आहे, त्या शब्दांच्या याद्या वयोवारीनें केल्यास तें जास्त उचित. शिवाय प्राथमिक शाळेंतील विद्यार्थ्यांच्या शब्दसंग्रहाचा विचार करतांना, *विद्यार्थी शाळेंत अथवा शाळेबाहेर आपल्या दैनंदिन आयुष्यक्रमांत ज्या* शब्दांचा उपयोग करतो ते शब्दहि विचारांत घेतले पाहिजेत.

* **प्राथमिक विद्यार्थ्यांच्या शब्दसंग्रहाचे प्रकार :**– प्राथमिक विद्यार्थ्यांच्या शब्दसंग्रहामध्यें सामान्यतः पुढील तऱ्हेच्या शब्दांचा समावेश झालेला दिसून येईल :–

(१) सभोंवतालच्या वातावरणांतील मुख्य मुख्य शब्द, शब्दसमुच्चय आणि मार्गदर्शक पाट्या वगैरे वाचण्यास उपयोगी पडणारे शब्द;

(२) साध्या प्रकारचीं एकत्र संबद्ध असलेलीं वाक्यें वाचण्यास उपयुक्त होणारे शब्द;

(३) उत्तमोत्तम व अत्यंत मनोरंजक गोष्टी व इतर बालवाङ्मय वाचण्यास उपयोगी पडणारे शब्द;

(४) सर्वसाधारण क्रमिक पुस्तकें वाचण्यास साहाय्यभूत होणारे शब्द;

(५) अधिक प्रौढ तऱ्हेचीं सर्वसामान्य पुस्तकें वाचण्यास उपयोगी पडणारे शब्द;

(६) खऱ्या हकीकती, निरनिराळ्या चळवळी व मनोरंजक परिस्थिति यांचें आकलन करण्यास समर्थ करणारे शब्द;

(७) मुलांच्या बोलण्यांत वरचेवर येणारे व म्हणून वाचनांत गोडी उत्पन्न करणारे शब्द;

---

* 'The Improvement of Reading' by Gates – page 141.

( ८ ) प्राथमिक शाळांतील मुलांच्या कार्यक्षेत्रांत मनोरंजकता उत्पन्न करणारे शब्द;

( ९ ) बोलण्यांत येणारे परंतु कठिण असणारे शब्द; आणि

( १० ) शब्दाच्या लांबीमुळें अथवा लिहिण्याच्या विशिष्ट अडचणींमुळें कठिण वाटणारे शब्द.

**मराठीसारख्या हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या भाषांच्या शब्दसंग्रहांची आवश्यकता :**– भाषाध्ययनाच्या विविध अंगांसंबंधी अशा तऱ्हेचे संशोधन-प्रयत्न ही पाश्चिमात्य देशांत नित्याचीच गोष्ट होऊन राहिली आहे. तिकडील बहुतेक सर्व शैक्षणिक मासिकांतून भाषाज्ञानसंपादनासंबंधी कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारचें संशोधन चालू असल्याचें दिसून येईल. परंतु हिंदुस्थानांत आपल्या प्रादेशिक भाषांसंबंधी अशा रीतीचे संशोधन-प्रयत्न फारच थोडे करण्यांत आले आहेत. हिंदी व बंगाली या भाषांसंबंधी उपयोगसातत्यावर आधारलेल्या शब्दावल्या अलीकडे तयार करण्यांत आल्या आहेत. रे. जे. सी. केनिंग ह्या वऱ्हाडामधील अध्यापनशास्त्रज्ञ मिशनरी गृहस्थांनीं फार श्रम घेऊन प्राथमिक विद्यार्थ्यांकरितां लिहिलेल्या हिंदी वाङ्मयांतून उपयोगसातत्यावर आधारलेली अशी पहिल्या चार हजार हिंदी शब्दांची क्रमवार यादी प्रसिद्ध करून फार महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. हिंदुस्थानाची भावी राष्ट्रभाषा या दृष्टीनें हिंदी भाषेकडे सर्व लोकांचें लक्ष वेधलें असतांनाच ही यादी प्रसिद्ध होण्याचें महत्त्व किती आहे हें स्पष्ट करण्याची जरूरी नाहीं. परंतु वर सांगितल्याप्रमाणें लेखनान्तर्भूत शब्दांच्या उपयोगसातत्यावर आधारलेल्या शब्दावल्यांमध्यें मुलांच्या सर्व प्रकारच्या शब्दसंपत्तीचा समावेश होऊं शकत नाहीं. म्हणूनच वयोमानानुसार वाढ होणाऱ्या मुलांच्या शब्दसंपत्तीचें ज्ञान करून देणाऱ्या संशोधनप्रयत्नांची जास्तच जरूरी भासते यांत नवल नाहीं.

**शब्दसंग्रहांची उपयुक्तता :**– वर वर्णिलेल्या शब्दावल्या प्राथमिक शाळेंतील शिक्षकांना अत्यंत उपयोगी पडतात; कारण विद्यार्थ्यांना आपलें शिकवणें अत्यंत सुलभ व्हावें अशा रीतीनें शिक्षकांना आपल्या भाषेला मुरड घालतां येते.

निष्णात शिक्षकाला विद्यार्थी व पाठ्यपुस्तकें यांच्या दीर्घकालीन अनुभवानें शब्दांच्या महत्त्वाचें व कठिनतेचें जें ज्ञान प्राप्त होतें तशाच प्रकारचें ज्ञान वरील-सारख्या शब्दावल्यांच्या साहाय्यानें अननुभवी शिक्षकाला प्राप्त करून घेतां येतें. त्याचप्रमाणें, निरनिराळ्या इयत्तांकरितां लिहिलेल्या क्रमिक पुस्तकांतील शब्द-संग्रहांत त्या त्या इयत्तांतील विद्यार्थ्यांच्या आकलनशक्तीच्या बाहेरचे शब्द किती आहेत याचें ज्ञानहि शब्दावल्यांच्या साहाय्यानें मिळूं शकतें. शब्दसंग्रहांतील निरनिराळ्या शब्दांच्या महत्त्वाची योग्य कल्पना येत असल्यामुळें विद्यार्थ्यांना कोणते शब्द शिकवूं नयेत, कोणते शब्द फक्त अर्थग्रहणाच्या दृष्टीनेंच — आत्मसात् करण्याच्या दृष्टीनें नव्हे — शिकवावे व कोणते शब्द पूर्णपणें शिकविले पाहिजेत याचें यथार्थ ज्ञानहि शिक्षकाला शब्दावल्यांवरून मिळवितां येतें.

या शब्दावल्यांचा तिसरा उपयोग प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांकरितां पुस्तकें लिहिणाऱ्या लेखकांना होतो; कारण अशा पुस्तकांतील शब्दसंग्रह जर मुलांना सहज आकलन होण्यासारखा असला, तर पुष्कळशीं पुस्तकें वाचण्याकडे मुलांची प्रवृत्ति होईल व त्यामुळें त्यांच्या ज्ञानांत भर पडेल; म्हणूनच संशोधन करून अशा तऱ्हेच्या उपयुक्त शब्दावल्या तयार करण्याचें महत्त्व जास्तच प्रतीत होतें.

**अशा तऱ्हेच्या संशोधनाच्या मार्गांतील अडचणी :—** वरील शब्दा-वल्यांच्या उपयुक्ततेचें विवेचन वाचून सहजच असें वाटूं लागतें हें संशोधनकार्य फारच सुलभ व आकर्षक असलें पाहिजे. परंतु संशोधनाची रूपरेषा आंखून प्रत्यक्ष सुरवातीची वेळ आली म्हणजे या संशोधनाच्या मार्गांतील अडचणी डोळ्यापुढें दत्त म्हणून उभ्या राहतात. कोणत्याहि भाषेसंबंधी संशोधन करतांना अशा तऱ्हेच्या अडचणी उत्पन्न होतातच व मराठी भाषा या गोष्टीला अपवाद नाहीं. मराठी भाषा बोलणारे लोक फार विस्तृत अशा प्रदेशांत पसरलेले आहेत व साहजिकच पुढील कारणांमुळें मुलांच्या शब्दसंग्रहामध्यें फरक आढळणें शक्य आहे :—

(१) भोंवतालच्या वातावरणामुळें मुलांच्या शब्दसंपत्तीवर परिणाम झालेला दिसेल. अशिक्षित लोकांमध्यें वावरणारीं मुलें अशिक्षित लोकांचे शब्द

उचलतील व ते शब्द बरेचसे ग्राम्य व असंस्कृत असण्याचा संभव आहे. जर मुलें सुशिक्षित समाजांत वावरणारीं असलीं, तर त्यांची भाषा साहजिकच सुसंस्कृत व प्रौढ अशी दिसून येईल. त्याचप्रमाणें, शेतकरीवर्ग व कामगारवर्ग यांच्यांत वावरणाऱ्या मुलांच्या शब्दसंग्रहांत त्या त्या प्रकारची छटा दिसून येईल. तसेंच, खेड्यांतील मुलांचा शब्दसंग्रह शहरवासी मुलांच्या संग्रहाहून निराळा असल्याचें दिसून येतें.

(२) पालकांच्या विशिष्ट सामाजिक दर्जाचा बराच मोठा परिणाम त्यांच्या मुलांच्या शब्दसंग्रहावर होईल. मुलांच्या पालकांचा सामाजिक दर्जा, त्यांची संपत्ति व समाजांतील स्थान, यांवर अवलंबून असतो. उच्च संस्कृतीच्या व दर्जाच्या घराण्यांतील मुलें पुष्कळसे सुसंस्कृत शब्द उपयोगांत आणतील व त्यांना निरनिराळे खेळ, खाद्य-पेय पदार्थ, साधनसामग्री, गृहसजावटीचें सामान, इत्यादि विषयांसंबंधी शब्दयोजना माहीत असेल; परंतु हेच शब्द सामान्य दर्जाच्या पालकांच्या मुलांना माहीत असणें शक्य होणार नाहीं. कधीं कधीं पालकांचा दर्जा त्यांच्या विशिष्ट जातीवर अवलंबून असतो. म्हणून पुढारलेल्या वर्गातील मुलांच्या उपयोगांत असलेल्या शब्दसंग्रहाचा बराचसा भाग साहजिकच अभिजात व सुसंस्कृत स्वरूपाचा असणार व कनिष्ठ अथवा मागसलेल्या वर्गाच्या मुलांचा शब्दसंग्रह कांहीं अंशीं तरी निराळ्या स्वरूपाचा असणार. धार्मिक आचार-विचारासंबंधींचे बरेचसे शब्द पुढारलेल्या अथवा उच्चवर्गीय विद्यार्थ्यांना ठाऊक असतील व मागसलेल्या वर्गाच्या विद्यार्थ्यांना बहुतांशीं ते ठाऊक नसतील.

(३) मुलांच्या शब्दसंग्रहावर प्रांतिक व ग्रामीण व्यावहारिक रूढाचारांचाहि परिणाम होत असतो. कोंकण विभागांत कांहीं विशिष्ट शब्दप्रयोग ज्याप्रमाणें आढळून येतात त्याचप्रमाणें देशावरहि आढळतात. या भिन्न भिन्न प्रांतांतील चालीरीति व सण यांमध्येंहि फरक दिसून येतो व म्हणून मुलांच्या शब्दसंग्रहावरहि याचा परिणाम होतो. पुण्यांतील मराठी भाषेचें वळण व रूप कोंकणांतील अथवा खानदेशांतील मराठीहून निराळें असल्याची खात्री पटते.

(४) कांहीं कांहीं जातींतील मुलें फार उशिरां शाळेंत जात असल्यामुळें,

वयोमानानुसार शब्दसंपत्तीच्या संशोधनाच्या कार्यांत अडचण उत्पन्न होते, कारण आठव्या वर्षी शाळेंत जाऊन शिक्षणाचा प्रारंभ करणाऱ्या मुलांचा शब्दसंग्रह केव्हांहि सामान्यतः आठ वर्षांच्या शब्दसंग्रहाहून कमी असणार.

( ५ ) अध्यापन-पद्धतींतील भेदांमुळेंहि मुलांच्या शब्दसंग्रहावर परिणाम होतो. ज्या विद्यार्थ्यांना शिक्षक वर्गांत बोलावयास लावून शिकविलेल्या शब्दांचा स्वतःच्या वाक्यांत उपयोग करावयास लावतात, अशा मुलांचा शब्दसंग्रह, जीं मुलें शाळेंत केवळ बसून ऐकण्याचेंच काम स्वस्थपणें करीत असतात, त्यांच्यापेक्षां खात्रीनें जास्त असतो.

**मुंबईतील विद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तीचें संशोधन करण्याची आवश्यकता :**—संशोधन मार्गांत वर वर्णिलेल्या अडचणी असल्यामुळें वयोमानानुसार पक्का व निर्णीत स्वरूपाचा मराठीचा शब्दसंग्रह ठरविणें फार कठीण आहे; कारण समाजाच्या निरनिराळ्या वर्गांमधील वैयक्तिक शब्दसंग्रह भिन्न भिन्न असेल असें नव्हे तर गांवा-गांवामध्येंहि वैयक्तिक शब्दसंग्रह निरनिराळा असूं शकेल.

उदाहरणार्थ :—मुंबईसारख्या मोठ्या शहरांतील पांच वर्षें वयाच्या मुलाला ' मजला, चाळ, जिना, गच्ची, फरशी, गॅलरी ' हे शब्द माहीत असतील, पण खेड्यांतील अथवा लहानशा गांवांतील मुलाला ठाऊक असलेले ' माजघर, ओटी, पडवी, गोठा, कौल ' वगैरे शब्द त्याला माहीत नसतील. खुद्द मुंबईतहि असें दिसून आलें आहे कीं, उच्चवर्गीय विद्यार्थ्याला ठाऊक असलेले ' तसबीर, खिडकी, शिरा, रविवार, जिना, मजला ' इत्यादि शब्द मध्यम अथवा मागसलेल्या वर्गांतील मुलाला ठाऊक असतात; पण ' आरशी, अडाळा, रवा, आइतवार, दादर व माळा ' अशा निराळ्या स्वरूपांमध्यें. म्हणून प्रस्तुत संशोधनामध्यें सामान्य व्यवहारोपयोगी शब्दसंग्रह वयोवार निश्चित करणें एवढेंच ध्येय ठेवतां येईल; कारण वर दर्शविल्याप्रमाणें जातीजातींतून, वर्गावर्गांतून व गांवागांवांतून भाषेमध्यें जरी भेद असले, तरीसुद्धां मराठी भाषा प्रचलित असणाऱ्या सर्व ठिकाणीं वाचनलेखनाला व भाषणाला उपयुक्त होतील असे सर्वसामान्य शब्द

असणारच, कारण इतर प्रचलित भाषांप्रमाणें मराठीलाहि एक निश्चित शिष्टमान्य स्वरूप आहे व असणें योग्य आहे. म्हणूनच, मुंबई शहरांतील उच्च, मध्यम व कनिष्ठ वर्गातील पांच ते नऊ वर्षे वयाच्या विद्यार्थ्यांच्या सामान्योपयोगी शब्दसंग्रहासंबंधीच संशोधन करण्याचें मी ठरविलें. मुंबई हें सर्व दर्जाच्या समाजाचें निवासस्थान असून तेथें मराठी भाषा प्रचलित असणाऱ्या सर्व विभागांतले लोक राहतात. म्हणून मुंबईतील विद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तीविषयीं ठरविलेले निर्णय थोड्याबहुत फरकानें इतर विभागांतील निर्णयाशीं जुळणारे होतील यांत संशय नाहीं.

# प्रकरण दुसरें

# संशोधनपद्धति व फलनिष्पत्ति

---

**संशोधनाची पद्धति :– शालापूर्व अवस्थेंतील विद्यार्थ्यांची शब्द-संपत्ति – उच्चवर्गीय मुलांची शब्दसंपत्ति :–**

गेल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें मुंबईतील बालविद्यार्थ्यांची शब्दसंपत्ति पांच ते नऊ वर्षें वयापर्यंत कशी वाढत जाते यासंबंधी संशोधन करावयाचें निश्चित केलें. तथापि ज्या मुलांना शब्दोच्चार करतां येतो व थोडेसें बोलतां येतें अशा तिसऱ्या वर्षाच्या मुलांपासूनच संशोधनाला सुरुवात करावी व मुलांची शालापूर्व अवस्थेंतील शब्दसंपत्ति किती असते हें पहावें असें ठरवून त्याप्रमाणें कामाला सुरुवात केली. नुकतींच दोन वर्षें पूर्ण झालेल्या उच्चवर्गांच्या मुलांपासून प्रारंभ करून क्रमाक्रमानें तीन, चार व पांच वर्षें पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांची पाहणी

करावयाचें ठरविलें. वरील वयाच्या मुलांना ज्या विषयांत नैसर्गिक गोडी वाटेल अशा तऱ्हेचे विषय निवडून त्यांसंबंधी त्यांच्याजवळ बोलणें सुरू केलें, आणि त्यांनीं दिलेलीं उत्तरें, उच्चारलेले शब्द व वाक्यें शक्य तितक्या कसोशीनें जशींच्या तशीं उतरून ठेवलीं. ज्या विषयांसंबंधीं मुलांशीं संभाषण केलें ते विषय पुढीलप्रमाणें होते :–

१ घर व सभोंवतालच्या गोष्टी,

२ आईबाप, इतर नातलग व कुटुंबांतील अन्य मंडळी,

३ शरीराचे अवयव व त्यांचें कार्य,

४ खाण्याचे पदार्थ, फळें व स्वयंपाकघरांतील वस्तु,

५ कपडेलत्ते व पोषाक,

६ पुस्तकें, चित्रें व पाट्या-पेन्सिली,

७ खेळ व खेळणीं,

८ पाळीव पक्षी व पशु,

९ सामान्य वागणूक,

१० घराबाहेरील निरीक्षण – बाग, रस्ता, समुद्रकिनारा वगैरे, आणि

११ वडील माणसांकडून ऐकलेल्या गोष्टी व मिळविलेली इतर माहिती.

तीन ते पांच वयाच्या लहान मुलांशीं संभाषण करीत असतां त्यांचें लक्ष व कुतूहल अर्धा तासपर्यंतसुद्धां टिकविणें हें फार कठिण काम होतें. म्हणून ज्या मुलाची तपासणी एका खेपेस संपत नसे त्या मुलाला थोडयोड्या वेळाच्या अंतरानें त्याच्या कलानुसार दोन-दोन तीन-तीनदां बोलावून आणून त्याच्याशीं बोलावें लागे व अशा रीतीनें वरील सर्व गोष्टींविषयीं संभाषण पुरें करावें लागे. वरील पद्धतीनुसार मी दोन ते चार वर्षें वयाचीं वीस मुलें तपासलीं. त्यांनीं दिलेल्या उत्तरांचें आणि बोललेल्या शब्दांचें व वाक्यांचें पृथक्करण केल्यानंतर मला असें आढळून आलें कीं, तिसऱ्या वर्षाच्या मुलाला सुमारें २५० शब्द माहीत होते व ते सर्व वस्तु, प्राणी व क्रिया दर्शविणारे असे बहुतेक मूर्त स्वरूपाचे होते. चौथ्या

वर्षाच्या मुलाचा शब्दसंग्रह तिसऱ्या वर्षाच्या मुलाच्या शब्दसंग्रहांत भर पडून सुमारें ४०० शब्दांचा होता.

**'मँटेसरी' वर्गांत शिकणाऱ्या मुलांची शब्दसंपत्ति** :– वर सांगितल्या-प्रमाणें शाळेंत न जाणाऱ्या मुलांची परीक्षा घेतल्यानंतर तीन ते चार वर्षें वयाच्या मँटेसरी वर्गांत शिकणाऱ्या पंधरा उच्चवर्गीय मुलांशीं वरील विषयांसंबंधीं संभाषण केलें. त्या वेळीं मला असें आढळून आलें कीं, या मुलांची शब्दसंपत्ति शाळेंत न जाणाऱ्या मुलांच्या शब्दसंग्रहापेक्षां पुढील बाबतींत जास्त विविध स्वरूपाची होती :–

१ पुष्कळ प्रकारच्या फळांची व फुलांची माहिती,

२ समुद्रकिनाऱ्यावरील दृश्यें व वाळूमध्यें चालणारे मुलांचे खेळ,

३ राणीचा बाग व तेथील पशुपक्षी,

४ निरनिराळे रंग,

५ दिवसाच्या विभागांचीं नांवें – आठवड्यांतील दिवसांचीं विनाक्रम नांवें,

६ क्रिकेटचें साहित्य – ठोकळ्यांपासून बनणाऱ्या आकृति, व

७ वीसपर्यंत क्रमवार संख्या.

**दोन ते चार वर्षें वयाच्या मध्यम व कनिष्ठ वर्गांतील मुलांची शब्द-संपत्ति** :– समान वयाच्या उच्च आणि मध्यम-कनिष्ठ वर्गांच्या मुलांच्या शब्द-संपत्तींत काय फरक दिसून येतो हें पाहण्यासाठीं मी वरील पद्धतीनेंच मध्यम व कनिष्ठ वर्गाच्या १५ मुलांची वैयक्तिक तपासणी केली. त्या वेळीं त्या मुलांचा शब्दसंग्रह उच्चवर्गीय मुलांच्या शब्दसंग्रहाहून पुढील बाबतींत कमी असल्याचें दिसून आलें :–

'१ त्यांना दिवसांचीं नांवें माहीत नव्हतीं,

२ पहिल्या दोन-तीन अंकांपलीकडील अंक मोजतां येत नव्हते, व

३ खाद्य पदार्थांचे निरनिराळे प्रकार, रंगांचीं नांवें, खेळणीं व फळें वगैरेंचें त्यांचें ज्ञान कमी होतें.

परंतु पशु-पक्षी, खाण्याचे सामान्य पदार्थ, शरीराचे अवयव व त्यांचें कार्य आणि पोषाकाच्या वस्तु यांचें ज्ञान त्यांना होतें. अशा तऱ्हेनें मध्यम व कनिष्ट वर्गांतील मुलांची शब्दसंपत्ति पुढारलेल्या वर्गांतील मुलांच्या मानानें आठ ते दहा टक्के कमी होती. दोन व तीन वर्षें वयाच्या मुलांचीं उत्तरें साधारणतः एकेरी शब्दांचीं असत आणि चार-पांच शब्द असलेलीं वाक्यें तीं क्वचितच बोलत असत. 'छान, लाल, खुप' अशा तऱ्हेचे वर्णनात्मक शब्द दोन-दोनदां उच्चारण्याची एक विशिष्ट लकब या मुलांमध्यें दिसून आली.

**पांच वर्षें वयाच्या मुलांचाः शब्दसंग्रह :–** यानंतर मी पांच वर्षें वयाच्या दहा मुलांशीं वरील तऱ्हेनेंच संभाषण केलें. त्या वेळीं मला असें आढळून आलें कीं, शाळेंत नुकताच जाऊं लागलेल्या पांच वर्षें वयाच्या मुलाचा शब्दसंग्रह सुमारें ५०० शब्दांचा होता. पांच वर्षें वयाच्या मुलांनीं उत्तरादाखल पांच-सहा शब्द असलेलीं वाक्यें सांगितलीं. पांच वर्षें वयाच्या मुलांचा शब्दसंग्रहसुद्धां बहुतेक मूर्त स्वरूपाचाच होता. तीन वर्षें वयाच्या मुलांच्या शब्दसंग्रहाची ती एक वाढवलेली आवृत्तीच होती.

दोन ते चार वर्षें वयाच्या मुलांनीं पुढील तऱ्हेचीं उत्तरें दिलीं.

**तिसऱ्या वर्षाचीं मुलें :–** मला खाऊ हवा, खेळ घरांत, नाना हपिसांत, बकेटांत पाणी, डोक्यावर टोपी ... इ.

**चौथ्या वर्षाचीं मुलें :–** ही माझी टोपी, तुम्ही दुसरी आणा, मी बाळूला देणार नाहीं, बापू पुस्तक नेतो, माझें पुस्तक नाहीं, कपांत दूध पितों, त्यांत साखर घालतों, दोरा बांधायचा, मग पतंग उडवायचा, पायांत बूट मला घालतां येत नाहींत.

**पांचव्या वर्षाचीं मुलें :–** राणीच्या बागेंत काल गेलो, उंदीर बिळांत राहतो, नळांतून थंड पाणी, बंबांतून गरम पाणी येते, दुपारची शाळा असते, सकाळीं दूध नि बिस्किट खाले.

वरील नमुन्यादाखल दिलेल्या उत्तरांवरून दोन ते चार वर्षें वयाचीं मुलें कोणत्या तऱ्हेचे शब्द व वाक्यें उपयोगांत आणतात हे कळून येईल.

**दहाव्या वर्षाच्या (९ पूर्ण) मुलांच्या शब्दसंग्रहाची कमाल मर्यादा :-** वर वर्णिल्याप्रमाणें संशोधनाच्या पायाची तयारी केल्यानंतर दहाव्या वर्षाच्या मुलाला जास्तींत जास्त किती शब्द येऊं शकतील हें पाहण्याचा विचार केला. या कामीं मदतीकरितां श्री. वा. गो. आपटे यांचा सव्वीस हजारांहून जास्त शब्द असलेला 'शब्दार्थ-चंद्रिका' हा कोश घेतला. उच्चवर्गीय दहाव्या वर्षाच्या मुलाला जास्तींत जास्त किती शब्द माहीत असूं शकतील, हें ठरविण्याकरितां मी उच्चवर्गीय बाराव्या वर्षाच्या दहा मुलांची परीक्षा त्यांना शब्दकोशांतील किती शब्द येतात हें जाणण्याकरितां वैयक्तिक तऱ्हेनें घेतली, व त्यांना माहीत असणाऱ्या शब्दांची नोंद ठेविली. त्यावरून असें दिसून आलें कीं, बाराव्या वर्षाच्या मुलाला सामान्यतः ६००० शब्दांचें ज्ञान असतें. बाराव्या वर्षाच्या मुलाला येणारे हे सहा हजार शब्द दहाव्या वर्षाच्या मुलाला तो कितीहि हुशार असला, तरी जास्तींत जास्त येऊं शकतील असें मी मानलें. बाराव्या वर्षाच्या दहा मुलांची वैयक्तिक परीक्षा घेण्याचें काम कित्येक दिवस चालवावें लागलें.

**सहा ते दहा वर्षे वयाच्या मुलांचा तात्पुरत्या स्वरूपाचा वयोवार शब्दसंग्रह :-** यानंतर १० व्या, ९ व्या, ८ व्या व ७ व्या अशा वयाच्या प्रत्येकीं दहा मुलांची परीक्षा, वरील सहा हजार शब्दांतील त्यांना किती शब्द येतात हें ठरविण्याकरितां घेतली, आणि येत नसलेले शब्द वगळण्याच्या पद्धतीनें ७, ८, ९ व १० वयाच्या मुलांच्या शब्दसंपत्तीच्या तात्पुरत्या याद्या तयार केल्या. या याद्या अर्थातच फक्त उच्चवर्गीय मुलांची परीक्षा घेऊन तयार करण्यांत आल्या. अशा रीतीनें दिवसानुदिवस काम करून व सुमारें शंभर विद्यार्थ्यांची एवढ्या व्यापक स्वरूपाची व्यक्तिगत परीक्षा घेऊन पांच ते नऊ वर्षे (पूर्ण) वयाच्या बालविद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तीच्या वयोवार वाढीची कल्पना आली.

**वयोमानानुसार वाढणाऱ्या शब्दांच्या अखेरच्या निश्चित स्वरूपाच्या याद्या :-**

**सहाव्या (५ पूर्ण) वर्षाचा शब्दसंग्रह :-** वरील तात्पुरत्या याद्या कितपत विश्वासार्ह व पक्क्या आहेत, हें ठरविण्याकरितां चढत्या वयानुक्रमानें

उच्चवर्गीय, मध्यमवर्गीय व कनिष्ठवर्गीय अशा पुष्कळ विद्यार्थ्यांची परीक्षा तात्पुरत्या शब्दसंग्रहांच्या साहाय्यानें घेणें भाग होतें. म्हणून सहाव्या वर्षाची यादी घेऊन त्या यादींतील शब्दांच्या साहाय्यानें उच्च, मध्यम व कनिष्ठ वर्गांच्या अनुक्रमें ३०, ३०, व १५ विद्यार्थ्यांची तपासणी करण्यांत आली, व त्यांना कोणते शब्द आले नाहींत याची नोंद ठेवण्यांत आली. नंतर तीनहि प्रकारच्या विद्यार्थ्यांची उत्तरें एकत्रित करून उत्तरांच्या संख्येनुसार शब्दांची पुन्हा रचना करण्यांत आली. ही रचना करतांना तपासलेल्या विद्यार्थ्यांपैकीं एकतृतीयांश विद्यार्थ्यांना जे शब्द आले नाहींत ते वगळण्यांत आले.

सातव्या ( ६ पूर्ण ) वर्षाचा शब्दसंग्रह :– सहाव्या वर्षाच्या यादींतून वगळलेले शब्द सातव्या वर्षाच्या तात्पुरत्या शब्दसंग्रहांत मिळवून त्या यादीच्या साहाय्यानें पूर्वीइतक्याच तीनहि प्रकारच्या विद्यार्थ्यांची तपासणी करण्यांत आली. उत्तरानुसार शब्दांची पुनर्रचना करून परीक्षा घेतलेल्या विद्यार्थ्यांपैकीं एकतृतीयांश विद्यार्थ्यांना न येणारे शब्द वगळण्यांत आले.

आठव्या ( ७ पूर्ण ) वर्षाचा शब्दसंग्रह :– सातव्या वर्षाच्या यादींतून वगळलेले शब्द आठव्या वर्षाच्या तात्पुरत्या यादींत समाविष्ट करून त्या यादीच्या मदतीनें पूर्वीप्रमाणेंच उच्च, मध्यम व कनिष्ठ वर्गांतील अनुक्रमें ३०, ३० व १५ अशा विद्यार्थ्यांची तपासणी करण्यांत आली व विद्यार्थ्यांच्या उत्तरानुसार आठव्या वर्षाची यादी नक्की ठरवून परीक्षित विद्यार्थ्यांपैकीं एकतृतीयांश विद्यार्थ्यांना माहीत नसलेले शब्द वगळण्यांत आले.

अशा रीतीनें सहाव्या, सातव्या व आठव्या वर्षाच्या विद्यार्थ्यांच्या पक्क्या शब्दावल्या तीनहि वर्गांच्या सुमारें २२५ मुलांची तोंडी वैयक्तिक परीक्षा घेऊन बनविण्यांत आल्या. शिवाय, प्रत्येक वर्गाच्या मुलांना माहीत नसलेल्या शब्दांची सरासरी काढून निरनिराळ्या वर्गांच्या मुलांना न येणाऱ्या शब्दांची शेकडेवारी ठरविण्यांत आली.

नवव्या ( ८ पूर्ण ) वर्षाचा शब्दसंग्रह :– वरील सहाव्या, सातव्या व आठव्या वर्षाच्या शब्दावल्या ठरविण्याचें हें काम वैयक्तिक परीक्षेवर अवलंबून

असल्यामुळें सकाळच्या व संध्याकाळच्या फुरसतीच्या वेळामध्येंच करावें लागलें. मुलें या परीक्षेला सहजासहजीं आनंदानें तयार होत नसत, कारण ही परीक्षा म्हणजे त्यांच्या हक्काच्या फुरसतीच्या वेळेवर आक्रमण होतें. ही अडचण दूर करण्याकरितां नवव्या वर्षाच्या जवळ जवळ एक हजार शब्दांची (यांतच आठव्या वर्षाच्या शब्दांतील वगळलेले शब्द घातलेले होते) परीक्षा घेण्याकरितां दोन प्रकारचे नवीन तऱ्हेचे प्रश्न तयार केले.

* त्यांतील पहिल्या तऱ्हेच्या प्रश्नांमध्यें यादींतील प्रत्येक शब्द योजण्याकरितां एक शब्द सोडलेलीं वाक्यें दिलेलीं होतीं व प्रत्येक वाक्यापुढें योग्य शब्दाची निवड करण्याकरितां समान स्वरूपाचे चार शब्द दिलेले होते. उदाहरणार्थ :—

**······ शरीर मजबूत होतें — अभ्यासानें, कवायतीनें, आळसानें, बसण्यानें.**

या चार शब्दांपैकीं 'कवायतीनें' या शब्दाखालीं मुलांनीं रेघ काढल्यास त्यांना तो शब्द येतो असें समजावयाचें.

† दुसऱ्या तऱ्हेच्या प्रश्नांमध्यें यादींतील एकेक शब्दापुढें समान जातीचे चार शब्द दिलेले होते व त्यांमध्यें एक शब्द मूळ शब्दाच्या अर्थासारखा परंतु सोप्या स्वरूपाचा होता. उदाहरणार्थ :—

**आपोआप — मुद्दाम, सहज, कष्टानें, जोरानें.**

या चार शब्दांपैकीं 'सहज' या शब्दाखालीं मुलांनीं रेघ काढल्यास त्यांना 'आपोआप' हा शब्द येतो असें समजावयाचें. ज्या अर्थी नवव्या वर्षाच्या मुलांना हे परीक्षाप्रश्न वाचून समजणें व त्यांची योग्य तीं उत्तरें देणें शक्य होतें त्याअर्थी वरील तऱ्हेचे प्रश्न सुमारें १००० शब्दांबद्दल तयार करून व छापवून उच्च, मध्यम व कनिष्ठ अशा तीनहि वर्गांच्या नवव्या वर्षाच्या मुलांना सोडविण्याकरितां द्यावयाचें ठरविलें.

---

* या प्रकाराला Holley Sentence Vocabulary Tests म्हणतात.

† या प्रकाराला Thorndike Test of word-knowledge म्हणतात.

हे एक हजार शब्दांसंबंधीचे प्रश्न सोळा तावांवर दोनहि बाजूंना छापावे लागले व नंतर एकेक ताव एकेका वेळेला मुलांना द्यावा लागला. हें काम करतांना असा अनुभव आला कीं, या प्रश्नांच्या नावीन्यामुळें पहिल्या-पहिल्यानें मुलांमध्यें परीक्षा देण्याबद्दल उत्सुकता दिसून आली. परंतु अशा रीतीनें सात-आठ कागद सोडवून झाल्यावर मुलांचें लक्ष हळूहळू कमी होऊं लागलें. यामुळें मोठ्या प्रयासानें मुलांचें लक्ष शेवटपर्यंत टिकवून ठेवावें लागलें. हे परीक्षाप्रश्न मुंबईतील निरनिराळ्या विभागांतील म्युनिसिपल मराठी शाळांतील उच्च, मध्यम व कनिष्ठ अशा सर्व वर्गांच्या विद्यार्थ्यांना देण्यांत आले. या संशोधनकार्याकरितां पुढील शाळांचा प्रत्यक्ष उपयोग करण्यांत आला :– गिरगांव म्युनिसिपल मुलांची मराठी शाळा, लॅमिंग्टन रोड म्युनिसिपल मराठी शाळा, करी रोड म्युनिसिपल मराठी शाळा, परेळ सेंट्रल स्कूल, नायगांव म्युनिसिपल मराठी शाळा इत्यादि. या शाळांमधील विद्यार्थ्यांची अशा तऱ्हेची दीर्घकालीन परीक्षा घेणें, मुंबई म्युनिसिपल स्कूल्स कमिटीनें दिलेल्या परवानगीमुळें व वरील शाळांचे मुख्याध्यापक व शिक्षक यांच्या सहकार्यामुळें शक्य झालें. परीक्षाप्रश्नांचे मुलांनीं सोडवलेले कागद नंतर जमा करण्यांत आले व प्रत्येक मुलाचे सर्व कागद एकत्र केल्यानंतर त्यांची उच्च, मध्यम व कनिष्ठ अशी वर्गवारी करण्यांत आली. नंतर प्रत्येक विद्यार्थ्यांचीं उत्तरें तपासून त्याला किती शब्द येत नाहींत हें ठरविण्यांत आलें. नंतर प्रत्येक वर्गाच्या चुकांची सरासरी घेऊन एकंदर शब्दसंख्येच्या मानानें माहीत नसलेल्या शब्दांची शेकडेवारी काढण्यांत आली. तेव्हां असें आढळून आलें कीं, नवव्या वर्षाच्या शब्दांपैकीं शेकडा बारा शब्द उच्चवर्गीय विद्यार्थ्यांना येत नव्हते, शेकडा अठरा मध्यमवर्गीयांना येत नव्हते व शेकडा वीस कनिष्ठवर्गीय विद्यार्थ्यांना येत नव्हते.

अशा तऱ्हेने उभ्या मांडणीनें निरनिराळ्या वर्गांच्या विद्यार्थ्यांना माहीत नसलेल्या शब्दांची शेकडेवारी ठरविल्यानंतर प्रत्येक शब्द किती मुलांना येत आहे हें ठरविण्याकरितां प्रत्येक शब्दापुढें प्रत्येक मुलाच्या उत्तराची आडवी नोंद केली. नंतर पूर्वीप्रमाणेंच, तपासलेल्या मुलांपैकीं एक-तृतीयांश मुलांना माहीत नसलेले शब्द नवव्या वर्षाच्या यादींतून वगळण्यांत आले व ते दहाव्या वर्षाच्या यादींत

समाविष्ट करण्यांत आले. अशा रीतीनें ३१० मुलांच्या १००० शब्दांसंबंधी दिलेल्या उत्तरांची मोजणी करण्याचें काम फारच श्रमाचें व व्यापक असल्यामुळें तें संपवावयास पुष्कळ दिवस मोडावे लागले. नंतर नवव्या वर्षाच्या शब्दांचा क्रम उत्तरांच्या अनुरोधानें पुनः लावण्यांत आला व नवव्या वर्षाच्या शब्दांची यादी पक्की करण्यांत आली. ( परीक्षाप्रश्नांचे नमुने शेवटीं परिशिष्टामध्यें दिलेले आहेत. )

दहाव्या ( ९ पूर्ण ) वयाचा शब्दसंग्रह :– नवव्या वर्षाच्या विद्यार्थ्यांचा शब्दसंग्रह ठरवितांना आलेल्या अनुभवाचा फायदा घेऊन दहाव्या वर्षाच्या मुलांना निराळ्या तऱ्हेचे परीक्षाप्रश्न द्यावेत असें मी ठरविलें. या कामाकरितां 'कर्कपॅट्रिक व व्हिपल' यांनीं तयार केलेला शब्दज्ञान ठरविण्याचा परीक्षाप्रकार निवडण्यांत आला. त्याकरितां दहाव्या वर्षाचे शब्द एकाखालीं एक असे कागदाच्या तावांवर दोनहि बाजूंला चार स्तंभांमध्यें छापण्यांत आले. मुलांना कागद दिल्यावर, माहीत असलेल्या शब्दापुढें 'अधिक' चिन्ह, माहीत नसलेल्या शब्दापुढें 'उणे' चिन्ह व संशय असलेल्या शब्दापुढें 'प्रश्न' चिन्ह मांडण्यास त्यांना सांगण्यांत आलें. अशा रीतीनें सर्व परीक्षाशब्दांचा समावेश फक्त पांचच कागदांमध्यें करण्यांत आला, व म्हणून विद्यार्थ्यांचें लक्षहि शेवटपर्यंत टिकविण्यांत आलें. शिवाय या प्रकारामुळें प्रत्येक मुलाचे पांच कागद जमवून, त्याला माहीत असलेले शब्द मोजण्याचें काम सुलभ झालें; व निरनिराळ्या वर्गांच्या मुलांना माहीत नसलेल्या शब्दांची शेकडेवारी काढण्यांत आली. अशा रीतीनें प्रत्येक मुलाच्या उत्तरांची उभी मोजणी संपल्यावर नवव्या वर्षाच्या शब्दांप्रमाणें प्रत्येक शब्द किती मुलांना येतो, हें ठरविण्याकरितां आडवी मोजणी करण्यांत आली. नंतर पूर्वीप्रमाणें तपासणी केलेल्या मुलांपैकीं एक-तृतीयांश मुलांना जे शब्द येत नव्हते ते दहाव्या वर्षाच्या शब्दांच्या यादींतून वगळण्यांत आले व उरलेले शब्द उत्तरांच्या क्रमानुसार पुनः मांडण्यांत येऊन, दहाव्या वर्षाची शब्दावलि पक्की करण्यांत आली. ( परीक्षाप्रश्नांचा नमुना शेवटीं परिशिष्टामध्यें दिलेला आहे. )

संशोधनाची फलनिष्पत्ति :— अशा रीतीनें पांच ते नऊ वर्षें वयाच्या विद्यार्थ्यांचा शब्दसंग्रह वयक्रमानुसार सुमारें एक हजार विद्यार्थ्यांची निरनिराळ्या तऱ्हांनीं परीक्षा घेऊन वर्तविण्यांत आला आहे.

प्रत्येक वर्षाचा शब्दसंग्रह पुढीलप्रमाणें आहे :—

कोटक – १

| पूर्ण वर्षें | अथवा | चालू वर्ष | माहीत असलेले शब्द |
|---|---|---|---|
| ५ | ,, | ६ वें | ५०० |
| ६ | ,, | ७ वें | ५०० + ६४० = ११४० |
| ७ | ,, | ८ वें | ११४० + ८५० = १९९० |
| ८ | ,, | ९ वें | १९९० + ९२० = २९१० |
| ९ | ,, | १० वें | २९१० + ११९० = ४१०० |

यावरून असें दिसून येईल कीं, दहाव्या वर्षाच्या मुलाच्या शब्दसंग्रहांत ४१०० शब्द असतात. वर्णक्रमानुसार रचना केलेली प्रत्येक वर्षाची शब्दावलि पुस्तकाच्या शेवटीं परिशिष्टांत दिलेली आहे. शब्दावलींतील प्रत्येक शब्दापुढें लिहिलेल्या अंकावरून तो तो शब्द महत्त्वाच्या दृष्टीनें कोणत्या थोकळ्यांत मोडतो हें समजून येईल. त्याचप्रमाणें सहाव्या वर्षाचा शब्दसंग्रह म्हणजे ५॥ ते ६॥ वर्षें वयाच्या मुलांचा शब्दसंग्रह, सातव्या वर्षाचा शब्दसंग्रह म्हणजे ६॥ ते ७॥ वर्षें

वयाच्या मुलांचा, आठव्या वर्षांचा म्हणजे ७॥ ते ८॥ वर्षे वयाच्या मुलांचा, नवव्या वर्षांचा म्हणजे ८॥ ते ९॥ वर्षे वयाच्या मुलांचा, आणि दहाव्या वर्षांचा म्हणजे ९॥ ते १०॥ वर्षे वयाच्या मुलांचा असा अर्थ समजला पाहिजे.

निरनिराळ्या वर्गांच्या मुलांना येत नसलेल्या शब्दांची शेकडे-वारी :– वर दर्शविल्याप्रमाणें निरनिराळ्या वयाच्या मुलांचा सामान्य शब्दसंग्रह निश्चित केल्यावर निरनिराळ्या वर्गांच्या मुलांना तात्पुरत्या शब्दसंग्रहांच्या मानानें शेकडा किती शब्द आले नाहींत हें पाहणें उद्बोधक होईल :–

कोष्टक – २

| वर्ष | अपेक्षित शब्दसंग्रह | निरनिराळ्या वर्गांच्या विद्यार्थ्यांस येत नसलेल्या शब्दांची शेकडेवारी | | |
|---|---|---|---|---|
| | | उच्च | मध्यम | कनिष्ठ |
| ६ वें | ५०० | ५ टक्के | ८ टक्के | १० टक्के |
| ७ वें | ११४० | ५ ,, | ८ ,, | १२ ,, |
| ८ वें | १९९० | ८ ,, | १० ,, | १६ ,, |
| ९ वें | २९१० | १२ ,, | १५ ,, | २० ,, |
| १० वें | ४९०० | १४ ,, | १६ ,, | २८ ,, |

कोष्टक – ३

| अखेरच्या पक्क्या शब्दावल्या तयार करण्याकरितां तपासलेलीं मुलें | | | | | | ९०० |
|---|---|---|---|---|---|---|
| | तोंडी, वैयक्तिक परीक्षा | | | लेखी, सामुदायिक परीक्षा | | |
| वर्ष | ६ वें | ७ वें | ८ वें | ९ वें | १० वें | |
| उच्चवर्गीय | ३० | ३० | ३० | ७५ | १२० | २८५ |
| मध्यमवर्गीय | ३० | ३० | ३० | १८० | १८० | ४५० |
| कनिष्ठवर्गीय | १५ | १५ | १५ | ६० | ६० | १६५ |
| बेरीज | ७५ | ७५ | ७५ | ३१५ | ३६० | ९०० |
| तात्पुरत्या शब्दावल्या तयार करण्याकरितां तपासलेलीं मुलें | | | | | | ११० |
| | | | | | एकंदर बेरीज | १०१० |

**प्रस्तुत शब्दसंग्रहांचें विशिष्ट लक्षण :–** प्रस्तुत वयोवार शब्दसंग्रहांचें महत्त्व विशिष्ट वयाच्या मुलांना किती शब्द येतात यांत नसून, त्यांना कोणते शब्द येतात यांत आहे. शब्दसंग्रहांच्या संख्यात्मक स्वरूपापेक्षां लक्षणात्मक स्वरूपाचें महत्त्व माझ्या दृष्टीनें जास्त आहे. विशिष्ट वयाच्या मुलांच्या शब्दसंग्रहांत किती शब्दांचा समावेश होतो एवढेंच केवळ समजून घ्यावयाचें असेल ( प्रत्यक्ष कोणत्या

शब्दांचा समावेश होतो असें नव्हे ) तर त्याकरितां दुसरा एक मार्ग आहे. त्याची पद्धति पुढीलप्रमाणें आहे :–

कोणत्या तरी विशिष्ट तत्त्वानुसार एखाद्या शब्दकोशांतून १०० शब्द निवडून त्या शंभर शब्दांसंबंधीं मुलांची परीक्षा घ्यावयाची. अर्थात् १८,००० शब्द असलेल्या शब्दकोशांतून : जर ते १०० शब्द निवडलेले असतील व ८ वर्षें वयाच्या मुलाला त्यांतील २० शब्द येत असतील, तर ८ वर्षें वयाच्या मुलाला येत असलेल्या शब्दांची संख्या २०×१८०=३६०० इतकी होईल; कारण त्या निवडक शंभर शब्दांतील प्रत्येक शब्दाची किंमत १८० शब्दांच्या बरोबर आहे ( १८,०००÷१००=१८० ). वर वर्णिलेली शब्दसंख्येची मोजणी विशेष आधारभूत मानतां येणार नाहीं, कारण मुलाला येत असलेल्या शब्दांची संख्या निवडलेल्या शंभर शब्दांच्या किमतीवर अवलंबून राहील. म्हणजेच शब्दकोशांत १८,००० शब्दांच्याऐवजीं २०,००० शब्द असतील, तर ८ वर्षें वयाच्या मुलाला माहीत असलेल्या वीस शब्दांची किंमत २०×२०० म्हणजे ४००० शब्द होईल. याकरितां शब्दसंग्रह निश्चित करण्याची वरील तऱ्हा लहान मुलांच्या शिक्षकांना अथवा लहान मुलांकरितां पुस्तकें लिहिणाऱ्या लेखकांना उपयोगी पडणार नाहीं. मात्र या तऱ्हेच्या मोजणीनें विशिष्ट वयाच्या मुलांना ठाऊक असलेल्या शब्दसंग्रहाच्या संख्येची कल्पना स्थूल मानानें येऊं शकेल. म्हणून, प्रस्तुत संशोधनाची फलनिष्पत्ति म्हणून तयार करण्यांत आलेल्या शब्दावल्यांना शब्दज्ञान अजमावण्याच्या इतर प्रकारांहून निराळें विशिष्ट महत्त्व आहे.

# प्रकरण तिसरें

# संशोधन-निष्कर्ष

निरनिराळ्या वयांच्या तयार केलेल्या शब्दसंग्रहांवरून पुढील निष्कर्ष काढतां येतात.

१. सहा ते दहा वर्षे वयाच्या मराठी बोलणाऱ्या विद्यार्थ्यांची शब्द-संपत्ति पाश्चिमात्य देशांतील मुलांच्या शब्दसंग्रहापेक्षां कमी आहे :- पाश्चिमात्य देशांतील सहाव्या व दहाव्या वर्षांच्या मुलांची शब्दसंपत्ति 'टर्मन' या संशोधकाच्या मताप्रमाणें अनुक्रमें ३६०० व ५४०० शब्द आहे. म्हणजे पहिल्या कोष्टकांत दिलेल्या मराठी भाषा बोलणाऱ्या विद्यार्थ्यांची शब्दसंपत्ति वर दिलेल्या पाश्चिमात्य देशांतील विद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तीपेक्षां कमी आहे हें दिसून येईल. याला पुढीलप्रमाणें बरींच कारणें आहेत.

( अ ) वरील शब्दसंग्रहांत साधित शब्दांचा अभाव :– मराठी मुलांचे निरनिराळ्या वयांचे शब्दसंग्रह तौलनिक दृष्टीनें कमी असण्याचें एक प्रमुख कारण असें आहे कीं, या शब्दसंग्रहामध्येंहि इंग्रजी शब्दसंग्रहाप्रमाणें नेणें, बसणें, उठणें अशीं क्रियापदांची मूळ रूपेंच घेतलेलीं आहेत – नेतो, नेला, नेईल अशीं काळवाचक रूपें घेतलेलीं नाहींत; कारण तीं रूपें सहज बनवितां येतात. त्याचप्रमाणें नेत, नेऊन, नेतांना इत्यादि निरनिराळ्या कृदन्त रूपांचाहि अंतर्भाव केलेला नाहीं. मराठीमध्यें कांहीं क्रियापदें अशीं आहेत कीं, त्यांचीं भूतकाळाचीं रूपें सामान्य नियमांप्रमाणें न होतां निराळ्या तऱ्हेनें होतात. जसें :– मरणें – मेला, करणें – केला, जाणें – गेला, येणें – आला, पिणें – प्याला, होणें – झाला इत्यादि. हीं भूतकाळीं रूपें मात्र वरील शब्दावल्यांत घातलेलीं आहेत. शिवाय वरील शब्दसंग्रहांत सर्व क्रियापदांच्या प्रयोजक रूपांचाहि समावेश केलेला नाहीं. कांहीं थोडीं महत्त्वाचीं प्रयोजक रूपें मात्र घेतलेलीं आहेत. सामान्यतः 'व' किंवा 'वि' हें अक्षर एकदां अथवा कधीं कधीं दोनदां शेवटच्या 'णें' या अक्षरापूर्वी योजून प्रयोजक क्रियापदें प्रत्येक क्रियापदापासून बनवितां येतात. जसें :– लिहिणें – लिहविणें, बसणें – बसविणें, शिकणें – शिकविणें, जाणें – जाववणें, देणें – देवविणें, पडणें – ( पाडणें ) पाडवणें. सर्व प्रयोजक रूपांचा अन्तर्भाव जर शब्दसंग्रहांत केला, तर शब्दांची संख्या पुष्कळ वाढेल. त्याचप्रमाणें मराठी भाषेमध्यें इतर भाषांप्रमाणें एका शब्दाला अनेक अर्थ असतात. अशा तऱ्हेच्या सर्व शब्दांची निरनिराळ्या अर्थांमध्यें पुनरावृत्ति प्रस्तुत शब्दावल्यांत केलेली नाहीं. फक्त नेहमींच्या उपयोगांतील कांहीं शब्दांची भिन्न भिन्न अर्थांमध्यें पुनरावृत्ति केलेली आहे. जसें :– गळा, पान, मुका, चिकू. प्रस्तुत शब्दसंग्रहांमध्यें शब्दांचा अन्तर्भाव त्यांच्या अत्यंत उपयुक्त अशा अर्थाला धरून केलेला आहे. त्याचप्रमाणें शब्दांचीं बहुवचनी रूपें, ता – त्व – पण – 'पणा वगैरे प्रत्यय लावून होणारीं भाववाचक नामें, व महिने आणि दिवस यांशिवाय इतर विशेषनामें यांचा अन्तर्भाव प्रस्तुत शब्दावल्यांत केलेला नाहीं.

( आ ) संस्कृत उपसर्ग जोडून होणाऱ्या शब्दांचा अभाव :– मराठी भाषा ही महाराष्ट्री या प्राकृत भाषेपासून निघालेली आहे व महाराष्ट्री भाषेचा

उगम संस्कृत भाषेतून झालेला आहे. म्हणून, मराठी भाषेमध्यें संस्कृतोद्भव शब्दांचा ( म्हणजेच तत्सम व तद्भव शब्दांचा ) बराच भरणा झालेला आहे. 'अ – अन्, सु, व दुर् – स्' यांसारखे उपसर्ग जोडून पुष्कळ नवीन शब्द बनतात. मराठीमध्येंहि नवीन शब्द बनविण्याची वरील तऱ्हा अमलांत आलेली आहे. त्यामुळें जे संस्कृत शब्द जसेच्या तसेच मराठींत आलेले आहेत, त्यांपासूनहि आणखी नवीन शब्द निघालेले आहेत, व त्यायोगें मराठी भाषेचा शब्दसंग्रह पुष्कळ वाढलेला आहे. अ – अन्, दुर् – दुस्, आणि सु हे प्रत्यय शब्दांपूर्वी जोडून मराठीमध्येंहि शब्द बनवितां येतात. जसें :– ज्ञान – अज्ञान, इष्ट – अनिष्ट, भाग्य – दुर्भाग्य, स्वर – सुस्वर, काळ – सुकाळ – दुष्काळ, स्थिति – सुस्थिति – दुःस्थिति. प्रस्तुत संशोधनाच्या आधारानें निश्चित केलेल्या शब्दावल्यांमध्यें अशा तऱ्हेनें बनणाऱ्या सर्व शब्दांचा समावेश केलेला नाहीं. फक्त सतत उपयोगांत येणाऱ्या शब्दांचा तेवढाच समावेश केलेला आहे.

( ६ ) मुलांच्या कुतूहलप्रेरित जिज्ञासेचें अपुरें समाधान :– हिंदुस्थानांत ज्या पद्धतीनें लहान मुलें वाढविलीं जातात, ती पद्धति शब्दसंपत्तींतील कमतरतेला कारणीभूत आहे. मुलें स्वभावतःच त्यांच्या मार्गांत येणाऱ्या विविध गोष्टी व वस्तु जाणण्याला उत्सुक व तत्पर असतात. नवीन जागीं सभोंवतालच्या वस्तूंबद्दल तीं नेहमीं वडील माणसांना ' याचें नांव काय ? याला काय म्हणावयाचें ? हें काय आहे ? ' अशा प्रश्नांनी भंडावून सोडतात. परंतु वडील माणसें त्यांच्या प्रश्नांचीं सहानुभूतिपूर्वक उत्तरें चटकन देऊन त्यांच्या उपजत कुतूहलप्रेरित बुद्धीला उत्तेजन देत नाहींत. यामुळें वडील माणसांची ही उदासीन व सहानुभूतिशून्य वागणूक नवीन गोष्टी जाणूं इच्छिणाऱ्या मुलांच्या नैसर्गिक उत्सुकतेला साहजिकच पायबंद घालते. वडील माणसें लहान मुलांच्या प्रश्नांना तत्परतेनें उत्तरें देत नाहींत एवढेंच नव्हे, :तर उलट त्यांना प्रश्न विचारण्याबद्दल शिक्षा करण्याची धमकी देतात. वाढत्या वयाच्या मुलाच्या जिज्ञासु मनावर या सर्व वागणुकीचा फार दूरवर पोंचणारा विपरीत परिणाम होत असतो. अशा तऱ्हेच्या वडील माणसांच्या वागणुकीचा परिणाम त्यांच्या शब्दसंग्रहाच्या वाढीवर होतो व त्यामुळें शब्दसंग्रहामध्ये वाढ होत नाहीं.

**(ई) आत्माविष्करणाला मिळणारा फार थोडा वाव :–** लहान मुलें स्वतःच्या मनांतील विचार व्यक्त करण्याला नेहमीं फार उत्सुक असतात. खरें म्हटलें, तर आत्मप्रकटीकरण हेंच मुलांचें जीवनसर्वस्व आहे. म्हणून लहान मुलांना आत्मप्रकटीकरणाला पूर्ण वाव मिळेल अशा रीतीची संधि त्यांना वारंवार दिली पाहिजे. घराबाहेरील निरनिराळ्या मनोरंजक ठिकाणीं मुलांना नेलें पाहिजे, व त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें पूर्ण सहानुभूतिपूर्वक रीतीनें दिलीं पाहिजेत. मुलांच्या मनाची करमणूक व्हावी म्हणून मनोरंजक पुस्तकें व चित्तवेधक चित्रें त्यांना दिलीं पाहिजेत. त्याचप्रमाणें, वाचलेल्या पुस्तकांसंबंधीं अथवा पाहिलेल्या निरनिराळ्या नव्या ठिकाणांसंबंधीं मुलांच्या बुद्धीला चालना मिळेल अशा तऱ्हेचे प्रश्न वडील माणसांनीं त्यांना विचारले पाहिजेत, म्हणजे त्या योगानें त्यांची कुतूहलबुद्धि सुप्तावस्थेंत असली तर जागृत होईल अथवा जिज्ञासाबुद्धि थोड्या प्रमाणांत असेल तर ती वाढीस लागेल. म्हणून वर सांगितलेल्या प्रकारांनीं मुलांच्या कुतूहलवृत्तीचें समाधान करणें अथवा थंड असणाऱ्या कुतूहलवृत्तीला जागृत करणें हें वडील माणसांचें काम आहे. आपल्या देशांतील वडील माणसें वरीलसारख्या गोष्टी बहुधा करीत नाहींत व म्हणून मुलांच्या आत्मप्रकटीकरणाच्या इच्छेला योग्य व पुरेसा अवसर देत नाहींत. वडील माणसांच्या अशा वागणुकीला पुढीलसारखीं कारणें असतात. एकतर वडील माणसें व्यवसायांत गढून गेलेलीं असतात, अथवा कुटुंबाची परिस्थिति अगदीं केविलवाणी असते, किंवा अशा वागणुकीमुळें मुलें उद्धट, गर्विष्ठ किंवा डोईजड होतील अशी वडील माणसांना भीति असते. आम्ही हिंदुस्थानांतील लोक एवढ्याच गोष्टी करून थांबत नाहीं, तर मुलांना खेळण्याला व स्वतःची करमणूक करून घेण्याला पुरेशी संधि देत नाहीं, आणि म्हणून सवंगड्यांशीं संबंध येऊन वाढूं शकणारा मुलांचा शब्दसंग्रह वाढत नाहीं. पालकांची अशी वागणूक होण्याचें कारण असें असतें कीं, वरीलप्रमाणें आपण मुलाला सवलत दिल्यास मुलाचा स्वभाव उथळ स्वरूपाचा होईल. यामुळें आपल्या इकडील उच्चवर्गीय सामान्य मूलसुद्धां सर्व प्रकारच्या कार्यांमध्यें व हालचालींमध्यें गंभीरवृत्ति धारण करतांना आढळतें; म्हणूनच त्याचें सामान्य ज्ञान वाढत नाहीं व शब्दसंग्रहहि अपुराच राहतो. सुसं-

स्कृत व साक्षर लोकांमध्यें वावरणाऱ्या उच्चवर्गीय मध्यमस्थितीतील मुलांची जर ही स्थिति, तर ज्यांचें सभोवतालचें वातावरण अनिष्ट स्वरूपाचें असतें अशा मध्यम व मागसलेल्या वर्गांतील मुलांची स्थिति काय होत असेल हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे.

पाश्चिमात्य देशांत अशी स्थिति बहुधा आढळून येत नाहीं. मुलांना आत्मप्रकटीकरण, मनोविनोदन, व सहज जिज्ञासापूर्ति याकरितां भरपूर अवसर देण्यांत येतो. हिंदुस्थानांतहि बदलत्या कालाप्रमाणें मुलांच्या विशिष्ट महत्त्वाची जाणीव लोकांना होऊं लागली आहे. मुलांच्या व्यक्तित्वाबद्दल आदर दाखविण्यांत येत असून विद्यार्थी हा शिक्षणाचें केन्द्र बनत चालला आहे. अशा या उत्साहजनक परिस्थितीमुळें भावी कालांत मुलांचा शब्दसंग्रह पाश्चिमात्य देशांतील मुलांच्या शब्दसंग्रहाजवळ जवळ आलेला दिसून येईल.

अगदीं अलीकडे आपल्या देशांतहि लहान मुलांच्या बाबतींत जास्त लक्ष घालून त्यांच्या व्यवस्थेंत सुधारणा करण्याकरितां निरनिराळ्या तऱ्हेच्या योजना चालू झाल्या आहेत. गांवागांवांतून क्रीडांगणांकरितां उघडीं मैदानें राखून ठेवून लहान मुलांच्या खेळांची व करमणुकीची सोय करण्यांत येत आहे. तान्ह्या मुलांची शारीरिक वाढ व जोपासना योग्य तऱ्हेनें व्हावी म्हणून मॉंटेसरी वर्ग आणि नर्सरीशाळा सुरू करण्यांत येत आहेत. अर्धपोटीं राहणाऱ्या लहान मुलांचें योग्य पोषण व्हावें म्हणून निरनिराळ्या योजनांचा विचार चालू आहे. लहान मुलांच्या व्यक्तित्वाला योग्य तो मान दिला पाहिजे ही गोष्ट आतां सर्वसंमत झाली आहे. हा बदललेला दृष्टिकोन समाजाच्या उच्चवर्गामध्यें मात्र आढळून येत आहे, आणि म्हणून शेतकऱ्याच्या किंवा कामगाराच्या मुलांची परिस्थिति फारशी बदललेली नाहीं व त्यामुळें सामान्य लोकांच्या मुलांना आत्मप्रकटीकरण व शब्दसंग्रहाची वाढ यांकरितां मिळणाऱ्या सोयी पूर्वीप्रमाणेंच मर्यादित आहेत.

**२. वयोमानानुसार शब्दसंग्रहामध्यें क्रमाक्रमानें वाढ होत असते व बालवयामध्यें शब्दसंग्रह बहुतेक मूर्तस्वरूपाचा असतो :—**

वयोमानानुसार होणारी वाढ :– पहिल्या कोष्टकांतील आंकड्यांवरून असें दिसून येईल कीं, पहिल्या तीन वर्षांतील शब्दसंग्रहाची वाढ क्रमाक्रमानें होत असते; परंतु दहाव्या वर्षी शब्दसंग्रहाची वाढ मोठ्या प्रमाणावर होते.

सहाव्या वर्षाच्या ५०० शब्दांच्या संग्रहामध्यें वयोमानानुसार होणारी क्रमवार वाढ :–

कोष्टक – ४

| वर्ष | ७ वें | ८ वें | ९ वें | १० वें |
|---|---|---|---|---|
| पहिल्या पांचशें शब्दां-नंतर होणारी वाढ. | ६४० | १४९० | २४१० | ३६०० |

सहाव्या वर्षाच्या शब्दसंग्रहाचें स्वरूप :– सहाव्या वर्षाचा शब्दसंग्रह प्रामुख्यानें मूर्त स्वरूपाचा असतो. त्यामध्यें बहुतांशीं घरासंबंधी शब्द असतात. जसें :– घराचे निरनिराळे विभाग दर्शविणारे शब्द, खुर्च्या, टेबलें, कपाटें वगैरे घराच्या सजावटीचें सामान दर्शविणारे शब्द, खेळणीं, खाण्याचे पदार्थ, फळें, पोशाख व कुटुंबांतील नातीं दर्शविणारे 'आई, बाप, भाऊ, बहीण,' इत्यादि शब्द. त्याचप्रमाणें या शब्दसंग्रहामध्यें पुढील प्रकारचे शब्दहि आढळतात. जसें :– निरनिराळे क्रियादर्शक शब्द, थोडेसे वर्णनात्मक शब्द, कांहीं सर्वनामें, शालेय व घराबाहेरील वातावरण दर्शविणारे शब्द, आणि घराभोंवतीं किंवा घरापासून दूर चालणाऱ्या हालचाली दर्शविणारे कांहीं शब्द. अशा तऱ्हेनें हा शब्दसंग्रह बहुतेक पूर्णपणें मूर्त स्वरूपाचाच असतो व त्यांत भावनात्मक किंवा अमूर्त स्वरूपाचे शब्द फारच थोडे असतात.

सातव्या वर्षाच्या शब्दसंग्रहाचें स्वरूप :– सातव्या वर्षाचा शब्दसंग्रह हा सहाव्या वर्षाच्या शब्दावलीची वाढवलेली आवृत्तीच असल्यामुळें बहुतांशीं मूर्त

स्वरूपाचाच असतो. या वयाचें मूल शाळेंत जात असतें, बालपुस्तक वाचतें आणि शिक्षकांनीं सांगितलेल्या गोष्टी ऐकतें. निरनिराळ्या ठिकाणांहून येणाऱ्या मुलांत तें मिसळतें व आपल्या सवंगड्यांबरोबर निरनिराळे खेळ खेळतें. त्याच्या दृष्टीला पुष्कळसे चित्रांचे तक्ते व सचित्र पुस्तकें पडतात. या सर्व गोष्टी मुलांच्या शब्दसंग्रहाच्या क्रमशः वाढीला पोषक होतात. तथापि या शब्दवृद्धीचें स्वरूप पूर्वीच्या वर्षांच्या शब्दसंग्रहाच्या स्वरूपाहून फारसें भिन्न नसतें. या वर्षाच्या मुलांना महिन्यांचीं नांवें व विशिष्ट धंदेवाल्यांचीं नांवें माहीत असतात. भावदर्शक किंवा अमूर्त स्वरूपाच्या शब्दांची संख्या सहाव्या वर्षाप्रमाणेंच जमेंत धरण्या-सारखी नसते.

आठव्या वर्षाच्या शब्दसंग्रहाचें स्वरूप :—मूल आठव्या वर्षी सामान्यतः दुसऱ्या इयत्तेंत शिकत असतें म्हणून वर्गाच्या क्रमिक पुस्तकांशिवाय तें जीं इतर गोष्टींचीं पुस्तकें वाचतें त्यांत आलेल्या नवीन शब्दांचा तें संग्रह करीत असतें. त्याला नकाशा दाखविला जातो, त्यामुळें निरनिराळ्या दिशांचीं नांवें माहीत होतात आणि त्याप्रमाणेंच तालुक्याचा भूगोलहि माहिती होतो. साहजिकच त्याच्या शब्दसंग्रहांत भर पडते. शिवाय दुसऱ्या इयत्तेंत मुलें कांहीं वस्तुपाठ शिकतात व यामुळेंहि त्यांचा शब्दसंचय वाढतो. मुलाची वाढ होत असतांना तें घर व शाळा याबाहेरील क्षेत्रांत हिंडतें फिरतें व त्या वेळीं त्याला नवीन नवीन मनुष्यें भेटतात व विविध स्थळें त्याच्या पाहण्यांत येतात. यामुळें सहजच मुलाला बऱ्याचशा नवीन शब्दांचा परिचय होतो.

नवव्या वर्षाच्या शब्दसंग्रहाचें स्वरूप :— नवव्या वर्षी मूल सामान्यतः तिसऱ्या इयत्तेंत शिकत असतें. त्या वेळीं त्याच्या शब्दसंपत्तीची वाढ पूर्वीप्रमाणेंच होत असते. भाषाविषयाचीं पाठ्य पुस्तकें व इतर सोपीं सोपीं अवांतर वाचनपुस्तकें यांशिवाय त्याला अंकगणित, भूगोल व सृष्टिशास्त्रांतील कांहीं पाठ शिकविण्यांत येतात. या सर्व विषयांच्या शिक्षणाचा परिणाम असा होतो कीं, मूल निर-निराळ्या विषयांना उपयुक्त असे विविध प्रकारचे नवीन शब्द शिकतें.

दहाव्या वर्षाच्या शब्दसंग्रहाचें स्वरूप :— या वर्षी मूल प्राथमिक

शाळांतील चौथ्या इयत्तेंत शिकत असतें. त्या वेळीं तें पूर्वीच्या वर्षांतील विषय जास्त विस्तृत स्वरूपांत शिकतें. त्याशिवाय आपल्या प्रांताच्या इतिहासासंबंधीं कांहीं सोप्या व मनोरंजक गोष्टी शिकतें. साहजिकच शब्दसंग्रह जलद गतीनें वाढत जातो व आपल्यास आढळून येतें कीं, शिशुवर्गांत दाखल झाल्यापासून पहिल्या पांचशें शब्दांच्या जोडीला शाळेंतील चार वर्षांमध्यें ३६०० नवीन शब्दांची तें भर घालतें. दहाव्या वर्षाच्या विद्यार्थ्याचें समाधान केवळ शालेय अभ्यासक्रम पुरा करण्यानें होत नाहीं, तर तो शाळेबाहेरच्या वेळामध्यें जास्त पुस्तकें वाचण्याचा प्रयत्न करतो आणि सध्यांच्या काळांत अशा रीतीचें वाचनाई साहित्य मिळणें फारसें कठीण जात नाहीं. शिवाय, या पांच वर्षांच्या शालेय आयुष्यक्रमामध्यें विद्यार्थी नवीन नवीन ओळखी करूं शकतो, नवीन नवीन खेळांत भाग घेतो, व नवीन नवीन स्थळांना भेटी देतो. लहानपणीं यदाकदाचित् नियंत्रणाखालीं असलेली त्याची नैसर्गिक जिज्ञासाबुद्धि या काळांत आपल्या स्वतःच्या प्रयत्नांनीं पुरी करण्याचा तो प्रयत्न करीत असतो. या सर्व गोष्टींचा नैसर्गिक परिणाम दहाव्या वर्षाच्या मुलांचा शब्दसंग्रह जोरानें वाढण्यास कारणीभूत होतो.

भाववाचक शब्द :– वरील सर्व विवेचनावरून असें आढळून आलें असेल कीं पहिल्या २-३ वर्षांचा शब्दसंग्रह मुख्यतः मूर्तस्वरूपी अर्थ असणाऱ्या शब्दांचा असणार व पुढील वर्षांमध्यें शब्दसंग्रहांतील भाववाचक अथवा अमूर्त स्वरूपाच्या शब्दांचें प्रमाण क्रमाक्रमानें वाढत जाणार. प्रस्तुत वयोवार शब्दावल्यांमध्यें खालीं दिल्याप्रमाणें वर्षावर्षाला भाववाचक शब्दांची क्रमशः भर पडत जातेः–

कोष्टक – ५

निरनिराळ्या वर्षांच्या शब्दसंग्रहांतील भाववाचक शब्द :–

| वर्ष | ६ वें | ७ वें | ८ वें | ९ वें | १० वें |
|---|---|---|---|---|---|
| भा.वा.श.संख्या | ४ | १४ | ३९ | ८४ | १६४ |
| एकंद.शब्दसंख्या | ५०० | ११४० | १९९० | २९१० | ४१०० |
| शेकडेवारी | १ | १ | २ | ३ | ४ |

**माध्यमिक शिक्षणांत वस्तुनिष्ठतेच्या (Concreteness) तत्त्वाची आवश्यकता** :– वरील पांचव्या कोष्टकांत दर्शविल्याप्रमाणें पहिल्या दोनतीन *वर्षांच्या शब्दसंग्रहांत मूर्त स्वरूपाच्या शब्दांचाच भरणा असल्यामुळें भाषाध्यापनाच्या* प्राथमिक अवस्थेंत वस्तुनिष्ठता किंवा क्रियानिष्ठता या तत्त्वाचें महत्त्व ध्यानांत येईल. म्हणूनच सर्व शिक्षणशास्त्रविशारदांनीं मूर्ताकडून अमूर्ताकडे या अध्यापनशास्त्राच्या *अतिशय महत्त्वाच्या सामान्य तत्त्वावर फार जोर दिलेला आढळतो.* मूल घरांत वावरत असतांना घरांतील वडीलधाऱ्या माणसांनीं त्याला जर पुष्कळशा गोष्टी प्रत्यक्ष दाखविल्या व समजून दिल्या तर मुलांचा शब्दसंग्रह निःसंशय वाढेल. नवीन शिकलेले शब्द मुलांना सुलभ रीतीनें लक्षांत ठेवितां येतील, कारण नवीन शिकलेला शब्द ऐकतांक्षणींच त्या शब्दानें दर्शविलेली वस्तु, प्रतिमा किंवा चित्र यांचें प्रतिबिंब मुलाच्या डोळ्यांपुढें स्पष्ट उभें राहील, आणि लगेच त्या शब्दाच्या अर्थाची बरोबर ओळख पटेल. मूल लहान वयांत उच्चारित शब्द व त्या शब्दानें *दर्शविलेली वस्तु किंवा क्रिया यांची सांगड मनामध्यें घालीत असतें.*

## ३. अगदीं लहान वयाचीं निरनिराळ्या वर्गाचीं मुलें एकच वस्तु दर्शविण्याकरितां निरनिराळ्या शब्दांचा उपयोग करतात. भिन्न वर्गाच्या मुलांनीं निरनिराळ्या शब्दांनीं दर्शविलेल्या वस्तु व पदार्थ :–

*या प्रकरणाच्या आरंभीं वर्णिल्याप्रमाणें* संशोधनाचा प्रारंभ मी च्चवर्गीय सामान्य स्थितींतील मुलांपासून केला. पहिल्यानें मीं उच्चवर्गीय हाव्या वर्षाच्या मुलाला माहीत असलेला शब्दसंग्रह ठरविला. नंतर ते शब्द ध्यम वर्गांतील अथवा कनिष्ठ वर्गांतील मुलांना येतात कीं नाहीं हें पाहण्याकरितां ा शब्दसंग्रहानुसार त्या त्या वर्गांतील समान वयाच्या मुलांची परीक्षा घेतली. ा वेळीं मला असें समजून आलें कीं उच्चवर्गीय मुलांना माहीत असलेले कांहीं ब्द मध्यम व मागसलेल्या वर्गांच्या मुलांना शिष्टसंमत स्वरूपांत माहीत नव्हते; रंतु त्या शब्दांनीं दर्शविलेल्या वस्तु भिन्न भिन्न नांवांनीं त्या मुलांना परिचित ोत्या. अशा तऱ्हेचे कांहीं शब्द पुढें दिले आहेत :–

| मूळशब्द | भिन्नरूप | मूळशब्द | भिन्नरूप |
|---|---|---|---|
| तसबीर | आरशी | जंत | दत |
| विळी | अडाळा | ठिणगी | किटाळ |
| शिरा | रवा | उकळी | कढ |
| रविवार | आइतवार | गच्ची | आगाशी |
| जिना | दादर | झुरळ | झिरलें |
| मजला | माळा | टेंगूळ | टिमरुक |
| अंडें | कवठ | गाठोडें | बोचकें |
| खराटा | वाडवण | मच्छर | मुरकुट |
| चिलट | चिनट | उंबरठा | हुंबरा |
| टेंख | देंठ | गळूं | केस्तुड |
| विहीर | वाव, वावडी | गुराखी | राखणा |
| तरंगणें | पेवणें | गढूळ | खदूळ |
| ओहोट | मुकती | पंजा | चवक |
| कौंल | नळा | झिजणें | झिरणें |
| माजघर | वळई | गुरें | गोरवें |

**मध्यमवर्गीय व कनिष्ठवर्गीय मुलांना शब्दांच्या शिष्टसंमत रूपांच्या ज्ञानाची आवश्यकता :–** कांहीं वस्तुदर्शक व क्रियादर्शक शब्दप्रयोगांतील वर दर्शविलेला फरक हा त्या त्या मुलांच्या विशिष्ट सामाजिक दर्जामुळें व सभोंवतालच्या वातावरणामुळें उत्पन्न झाला आहे. दुसऱ्या प्रकरणांत दर्शविल्या-प्रमाणें मराठी भाषेमध्यें प्रांतिक, ग्रामिक व जातीय वगैरे स्वरूपाचे जरी बरेच भेद असले तरी भाषेच्या स्थैर्याच्या दृष्टीनें भाषेचें शिष्टसंमत रूप टिकविणें अगत्याचें आहे. म्हणून ज्या शिक्षकांच्या हाताखालीं मध्यम व कनिष्ठ वर्गाचे विद्यार्थी शिकत आहेत त्यांनीं मुलांची भाषा व शिष्टसंमत भाषा यांतील फरक कोठें व कसा आहे हें फार काळजीपूर्वक रीतीनें लक्षांत घेतलें पाहिजे, व मुलांना शिकवितांना शब्दांचीं शिष्टसंमत रूपें क्रमाक्रमानें उपयोगांत आणलीं पाहिजेत.

त्याचप्रमाणें उच्चवर्गीय विद्यार्थ्यांपेक्षां मध्यम व कनिष्ठ वर्गांच्या मुलांना कमी शब्द माहीत असतात हें वर दर्शविलेलें आहे व ही उणीव भाषेंतील आवश्यक शब्दांसंबंधीच आहे. म्हणून, मध्यम व कनिष्ठ वर्गीय मुलांना उच्चवर्गीय मुलांच्या बरोबरीला आणणेंच योग्य होईल. उच्चवर्गीय मुलांना मध्यम व कनिष्ठ वर्गीय मुलांच्या पातळीवर आणणें योग्य होणार नाहीं. आणि असें झालें तरच मराठी भाषेला स्वतःचें शिष्टसंमत रूप योग्य तऱ्हेनें संभाळतां येईल.

**मध्यम व कनिष्ठ वर्गांच्या मुलांना परिचित नसलेले कांहीं शब्दः—**

निरनिराळ्या वयाच्या मध्यम व कनिष्ठ वर्गीय मुलांना माहीत नसलेले शब्द पुढें दिले आहेत :—

### सहावें वर्ष

चैत्र ते फाल्गुन हीं महिन्यांचीं नांवें; शिकरण, श्रीखंड, बासुंदी, अनरसा यांसारखीं पक्वान्नें; तक्क्या, तुमान, अभ्रा यांसारखे कांहीं वस्तुवाचक शब्द; मनगट, भुवई यांसारखे अवयववाचक शब्द.

### सातवें वर्ष

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कठडा, | बंब, | तोरण, | वाढदिवस, | जहाज, |
| केशर, | बैठक, | पीतांबर, | परीट, | पलंगपोस. |

### आठवें वर्ष

| | | | |
|---|---|---|---|
| आषाढी | जायफळ | जावई | गुलाबपाणी |
| कलाबतू | गुलाबदाणी | सासू | अत्तर |
| सासरा | षष्ठी | यंत्र | पणजी |
| मुरांबा | सोवळा | गोग्रास | ओवळा |
| अध्याय | तंबुरी | वनवास | रसभंग |
| मनोरंजक | प्रदर्शन | खडावा | जाजम |

कारंजें.

### नववें वर्ष

| | | | |
|---|---|---|---|
| गालिचा | देशांतर | उत्सुक | आचारी |
| अलगुज | झिळमिळ्या | शिखर | ढाल |
| गुलकंद | स्तोत्र | मासिक | बरफी |
| उदार | आप्तमित्र | तुरा | मुंज |

### दहावें वर्ष

| | | | |
|---|---|---|---|
| मुखमार्जन | कोजागरी | कलाकौशल्य | कलम |
| आगमन | साहस | आरंभशूर | सीमोल्लंघन |
| अंध | समंजस | कुडतें | अगांतुक |
| नोंदणी | दुलई | परकीय | अंधुक |

कनिष्ठ वर्गीय विद्यार्थ्यांनाच माहीत नसलेले शब्द :– मध्यम व कनिष्ठ वर्गीय विद्यार्थ्यांच्या शब्दज्ञानामध्येंहि कांहीं फरक आढळतो. मध्यवर्गीय विद्यार्थ्यांना परिचित असलेले परंतु कनिष्ठ वर्गीय विद्यार्थ्यांना अपरिचित असे कांहीं शब्द पुढें दिले आहेत :–

### सहावें वर्ष

११ ते २० संख्यावाचक शब्द; आत्याबाई, मावशी यांसारखे नातें दर्शविणारे शब्द; पाडवा, चतुर्थी यांसारखे विशिष्ट महत्त्वाचे दिवस दर्शविणारे शब्द; खुंटी, सतरंजी, खलबत्ता यांसारखे सामान्य शब्द.

### सातवें वर्ष

| | | | |
|---|---|---|---|
| आधण, | वीज | आजार | जानवें |

### आठवें वर्ष

| | | | |
|---|---|---|---|
| गुंडा | स्त्री | भाऊबीज | साजूक |
| भाडेकरी | स्नान | किनारा | थाट |
| ज्वाळा | देखावा | चेहरा | नमुना |

नववें वर्ष

| | | | |
|---|---|---|---|
| बारसा | घेरी | चिपळी | भस्म |
| पाया | माला | गोप | छप्पर |
| | आदर | | |

दहावें वर्ष

| | | | |
|---|---|---|---|
| अपयश | मिष्टान्न | माणसाळणें | स्मारक |
| ज्वालामुखी | डाक | समेट | दर्यावर्दी |
| कमकुवत | सुकाळ | परस्पर | परकीय |

निरनिराळ्या वर्गांच्या मुलांच्या शब्दसंग्रहांतील वरील भेदावरून असें स्पष्ट सिद्ध होतें कीं भोंवतालची परिस्थिति आणि समाजांतील दर्जा या दोन गोष्टींचा मुलांच्या शब्दसंग्रहावर फार मोठा परिणाम होतो. परंतु जर शिक्षक मनांत आणतील व मनापासून यत्न करतील तर ते अध्यापन करतां करतांनाच वरीलसारखे विशिष्ट शब्द त्या त्या वर्गाच्या मुलांना शिकवूं शकतील आणि मध्यम व कनिष्ठ वर्गीय विद्यार्थ्यांना उच्चवर्गीय विद्यार्थ्यांच्याबरोबर आणूं शकतील.

## ४. वयोवार शब्दावल्यांतील निरनिराळ्या जातीच्या शब्दांमध्यें वयानुक्रमें क्रमाक्रमानें वाढ होते.

वयोमानानुसार शब्दसंग्रहांचें चार प्रकारचें *वर्गीकरण* :– निरनिराळ्या वयाच्या शब्दसंग्रहांतील व्याकरण-दृष्टया भिन्नभिन्न जातीच्या शब्दांची वाढ कसकशी होते, हें पाहण्याकरितां, नामें (सर्वनामांसह), विशेषणें, क्रियापदें व अव्ययें अशा चार वर्गांमध्यें शब्दसंग्रहांचें वर्गीकरण केलें. पुढील कोष्टकावरून यासंबंधीं नीट कल्पना येईल :–

कोष्टक — ९

| वर्ष | नामें-सर्वनामें | विशेषणें | क्रियापदें | अव्ययें | बेरीज |
|---|---|---|---|---|---|
| ६ वें | ३५५ | ४९ | ८० | १६ | ५०० |
| ७ वें | ७५६ | १६९ | १७८ | ३७ | ११४० |
| ८ वें | १२९४ | ३१० | २८३ | १०३ | १९९० |
| ९ वें | १८७८ | ४५८ | ४१५ | १५९ | २९१० |
| १० वें | २६९५ | ६६८ | ५१६ | २२१ | ४१०० |

वरील कोष्टकावरून असें दिसून येईल कीं शब्दांच्या चारहि प्रकारांतील वयोवार वाढ क्रमाक्रमानें झाली आहे, मात्र नवव्या व दहाव्या वर्षाच्या शब्द-संग्रहांतील अव्ययें व दहाव्या वर्षाच्या शब्दावलींतील क्रियापदें यांमध्यें वाढ झालेली दिसून येत नाहीं. परंतु एकंदरीनें हा फरक विशेष लक्षांत घेण्यासारखा नाहीं.

**प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांच्या मराठी शब्दसंग्रहावर होणारा संस्कृतचा परिणाम :**— बरेच वेळां असें म्हणण्यांत येतें कीं मराठी भाषेचें स्वरूप आलंकारिक व संस्कृतप्रचुर आहे. सुबुद्ध व सुशिक्षित लोक भाषण-लेखनांत जी मराठी भाषा वापरतात ती संस्कृत शब्दांनीं भरलेली असते, आणि म्हणून सामान्य जनसमूहाला त्या भाषेचा उपयोग होत नाहीं; कारण संस्कृत शब्दांमुळें ती दुर्बोध होते. अशा प्रकारची भाषा साक्षरतेच्या प्रसाराच्या आड येते.

प्रस्तुत संशोधनानुसार तयार केलेल्या शब्दावल्यांना वरील दोष कितपत लागू होतो हें पाहण्याकरितां प्रत्येक वयाच्या शब्दसंग्रहाचें सूक्ष्म अवलोकन करून

प्रत्येक वर्षाच्या शब्दसंग्रहामध्यें किती संस्कृत शब्दांचा अंतर्भाव झालेला आहे हें पाहिलें.

कोष्टक – ७

| वर्ष | ६ वें | ७ वें | ८ वें | ९ वें | १० वें |
|---|---|---|---|---|---|
| एकंदर शब्द | ५०० | ११४० | १९९० | २९१० | ४१०० |
| संस्कृत शब्द | १४ | ३१ | ९४ | २०० | ४४१ |
| शेकडेवारी | ३ | ३ | ५ | ७ | ११ |

वरील पृथक्करणावरून असें दिसून येईल कीं आरंभींच्या शब्दसंग्रहांमध्यें संस्कृत शब्दांचें शेकडा प्रमाण अत्यंत अल्प असून दहाव्या वर्षाच्या शब्दसंग्रहामध्यें तें शेकडा अकरा इतकेंच आहे. या संस्कृत शब्दांपैकीं एक-तृतीयांशाहून जास्त शब्द मराठीशीं इतके एकरूप झालेले आहेत कीं ते संस्कृत असावेत अशी शंकाहि येत नाहीं. अशा रीतीनें प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांच्या शब्दसंग्रहाचाच विचार केला तर असें दिसून येईल कीं वर निर्दिष्ट केलेला संस्कृतप्रचुरत्वाचा दोष प्रस्तुत शब्दावल्यांना मुळींच लागू होत नाहीं. म्हणून अशा तऱ्हेच्या शब्दावल्यांवर आधारलेलीं पुस्तकें बहुजनसमूहाच्या हातांत पडल्यास साक्षरताप्रसाराच्या मार्गांतील एक मोठी अडचण दूर होईल.

आधुनिक मराठी वाङ्मयाचें स्वरूप :– असा एक काळ होता कीं ज्या वेळीं मराठी भाषेंत संस्कृत शब्दांचा जास्त भरणा करणें हें सुसंस्कृत वक्ता व लेखक यांचें मुख्य लक्षण समजलें जात असे. अलीकडे मात्र या प्रवृत्तींत इष्ट प्रकारचा बदल होत आहे व मराठी भाषेमध्यें संस्कृत शब्दांचा उपयोग आवश्यकच आहे असें नाहीं असा मतप्रवाह सुरू झाला आहे. पूर्वी ज्या कल्पना अथवा

विचार प्रदर्शित करण्याकरितां संस्कृत शब्दांचा उपयोग केला जात असे त्या कल्पना व विचार केवळ मराठी शब्दांनीं दर्शविण्याचे प्रयत्न हल्लीं चालू आहेत. प्राथमिक शाळांतील क्रमिक पुस्तकें, व इतर अवांतर वाचनाचीं पुस्तकें यांचा म्हणजेच विशेषतः बालवाङ्‌मयाचा व सामान्यतः आधुनिक मराठी वाङ्मयाचा कल शुद्ध मराठी शब्द योजण्याकडे असून शक्य तोंवर कठीण संस्कृत शब्द टाळण्याकडे आहे. याबद्दल जास्त विवरण पुढील प्रकरणांत केलें जाईल.

**सर्व प्रकारच्या व सर्व वर्गांच्या मुलांना ग्रामीण व नागर जीवनासंबंधी शब्दपरिचय करून देण्याची आवश्यकता :**— पहिल्या प्रकरणांत दर्शविल्याप्रमाणें कांहीं विवक्षित शब्द खेड्यांतील वातावरणाला धरून असतात व कांहीं शहरी वातावरणाला जुळणारे असतात. खेड्यांतील मुलांना शहरी वातावरणासंबंधाचे कांहीं विशिष्ट शब्द माहीत नसतात तर शहरांतील मुलांना खेड्यांतील परिस्थितीसंबंधीचे कांहीं विशिष्ट शब्द परिचित नसतात, असा सार्वत्रिक अनुभव आहे. म्हणून खेड्यांतील मुलें व शहरांतील मुलें अशा प्रकारानें वाढविलीं पाहिजेत कीं, तीं एकमेकांबद्दल सहानुभूति बाळगूं लागतील, परस्परांचा दृष्टिकोन सहृदयतेनें समजून घेतील व एकमेकांच्या राहणीबद्दल आदर बाळगतील. हें उद्दिष्ट सिद्धीस न्यावयाचें असेल तर शहरवासी मुलांना ग्रामीण जीवनावरील कांहीं पाठ शिकविले पाहिजेत व त्याचप्रमाणें खेड्यांतील मुलांना नागर जीवनासंबंधीं कांहीं पाठ शिकविले पाहिजेत. मात्र अशा तऱ्हेचे पाठ शिकवितांना नवीन शब्दांचा परिचय योग्य तऱ्हेने करून दिला पाहिजे. त्वरित व सोप्या दळणवळणाच्या वाढत्या सोयींमुळें खेड्यांतील लोक व शहरांतील लोक यांच्या जीवनपद्धतींतील अंतर दिवसेंदिवस कमी होत चाललें आहे. शहरवासीयांनाहि खेड्यांतील साध्यासुध्या, उत्साही व सुदृढ जीवनाचें महत्त्व कळावयास लागलें आहे व त्याबरोबरच खेड्यांतील लोकांना शहरांतील सुधारलेल्या राहणीचा उपयोग कळलेला आहे. शहरांतील व खेड्यांतील विद्यार्थ्यांना अनुक्रमें खेड्यांतील व शहरांतील जीवनासंबंधी कांहीं पाठ शिकविण्याची योजना केली तर अगदीं आरंभापासूनच मुलांच्या मनांतील उचनीचतेच्या कल्पनांची वाढ होण्याला आळा बसेल.

**प्रस्तुत मराठी शब्दसंग्रह व थॉर्नडाइक यांचा इंग्रजी शब्दसंग्रह यांची तुलना :–** प्रस्तुत संशोधनानुसार तयार केलेल्या वयोवार शब्दावल्यांचें वरीलप्रमाणें समालोचन करून आलेल्या निष्कर्षांचा आतांपर्यंत आढावा घेतल्यानंतर, या शब्दावल्या थॉर्नडाइक यांच्या इंग्रजी शब्दसंग्रहाशीं ताडून पाहणें इष्ट होईल. असें करण्याकरितां वरील यादींतील ४१०० शब्दांची थॉर्नडाइक यांच्या पहिल्या ४१०० शब्दांशीं तुलना करण्यांत आली. ही तुलना अर्थातच इंग्रजी शब्दांच्या मराठी रूपांतराचा विचार करून करण्यांत आली. अशी तुलना केल्यानंतर असें दिसून आलें कीं, दोन्ही संग्रहांतील सुमारें तीन-चतुर्थांश शब्दांमध्यें अर्थदृष्ट्या साम्य आहे. प्रस्तुत मराठी संग्रह पहिल्यानें वयोवार रचण्यांत आले व नंतर प्रत्येक वयाच्या शब्दांची पुनर्रचना उपयोग-सातत्यानुसार करण्यांत आली. थॉर्नडाइक यांचा शब्दसंग्रह बालवाङ्मय व प्रौढवाङ्मय अशा दोन्ही प्रकारच्या लिखाणांत आढळलेल्या शब्दांच्या उपयोग-सातत्यावर आधारलेला आहे. म्हणून थॉर्नडाइक यांचा शब्दसंग्रह व प्रस्तुत मराठी शब्दसंग्रह यामध्यें अर्थदृष्ट्या व संख्यादृष्ट्याच साम्य आढळणें शक्य होतें – रचनेच्या क्रमामध्यें नव्हे. वर लिहिल्याप्रमाणें दोन्ही संग्रहांत जवळजवळ ८० टक्के साम्य दिसून आल्यामुळें प्रस्तुत मराठी शब्दावल्यांची विश्वसनीयता वाढली आहे.

**मराठी शब्दसंग्रहाची हिंदी शब्दसंग्रहाशीं तुलना :–** या नंतर मी माझ्या मराठी शब्दसंग्रहाची गे. केनिंग यांच्या ४००० हिंदी शब्दसंग्रहाशीं तुलना केली. हा हिंदी शब्दसंग्रह बहुशः लहान मुलांकरितां लिहिलेलीं क्रमिक पुस्तकें, कथापुस्तकें व अवांतर वाचनपुस्तकें यांतील शब्दांची मोजणी करून बनवलेला आहे. म्हणून मराठी शब्दसंग्रह व हिंदी शब्दसंग्रह यांमध्यें जास्त प्रमाणांत साम्य दिसलें पाहिजे अशी माझी अपेक्षा होती. मराठी शब्दसंग्रहांतील शब्दांची हिंदी शब्दसंग्रहांतील शब्दांच्या शुद्ध मराठी रूपांतराबरोबर तुलना केल्यावर असें आढळून आलें कीं, माझी वरील अपेक्षा योग्य होती. कारण या दोन्ही शब्दसंग्रहांमध्यें अर्थदृष्ट्या तीन-चतुर्थांशाहून जास्त प्रमाणांत साम्य दिसून आलें. मराठी ही इंग्रजीपेक्षां हिंदी

भाषेला जास्त जवळची आहे, कारण मराठीप्रमाणेंच हिंदीमध्येंहि संस्कृत शब्दांचा बराच भरणा आहे. याकरितां दोन्ही संग्रहांतील संस्कृत शब्द ताडून पाहिले तेव्हां असें दिसून आलें कीं, हिंदी शब्दसंग्रहांमध्यें हजाराहून जास्त संस्कृत शब्द आहेत. मराठी शब्दावल्यांत मात्र फक्त ४५० आहेत. वरील प्रकारची मराठी-इंग्रजी आणि मराठी-हिंदी शब्दसंग्रहांची तुलना वास्तविक शास्त्रीय दृष्टया करणें योग्य नव्हे, कारण दोन्ही शब्दावल्या निरनिराळ्या तत्त्वांवर आधारलेल्या आहेत. परंतु वरीलप्रमाणें तुलना करून दिसून आलेल्या साम्यामुळें प्रस्तुत मराठी शब्दावल्यांची विश्वसनीयता व सत्यता बऱ्याच अंशांनीं सिद्ध झालेली आहे.

# प्रकरण चवथें

# शब्दसंग्रहांचा उपयोग

* प्राथमिक शाळांतील शिक्षकांना उपयोग :– पहिल्या प्रकरणाचे शेवटीं असें म्हटलेलें आहे कीं, हे शब्दसंग्रह प्राथमिक शाळांतील शिक्षकांना फार उपयोगी आहेत. कारण शाळेंत मुलांना शिकवितांना शिक्षक ज्या शब्दांचा उपयोग करतात ते शब्द त्यांना या संग्रहांशीं ताडून पाहतां येतील. बरेच वेळां बालविद्यार्थ्यांना शिक्षकाची भाषा समजणें कठीण जातें असा अनुभव आहे; आणि म्हणून मुलांना शिकविण्यांत येणाऱ्या बऱ्याच गोष्टी त्यांना समजत नाहींत. प्रमाणभूत अशा वयोवार शब्दावल्यांच्या अभावीं शाळेंत नुकताच प्रवेश करणाऱ्या

* 'Four Thousand Important Hindi words' by J. C. Koenig. Introduction.

मुलांच्या शब्दसंग्रहाची जाणीव बऱ्याच शिक्षकांना नसते. ज्या ठिकाणीं मराठी भाषेचें शिष्टसंमत रूप प्रतिदिनीं योजल्या जाणाऱ्या मराठी भाषेहून पुष्कळ निराळें असतें त्या ठिकाणीं ही अडचण जास्तच तीव्र होते. कांहीं खेड्यांमध्यें बोलभाषेंतील शब्द वाङ्मयीन भाषेंतील शब्दांहून पुष्कळ निराळे असतात. अशा ठिकाणीं शिक्षकांनीं योजलेल्या शब्दांपैकीं फारच थोडे विद्यार्थ्यांना समजतात. अशा वेळीं शिक्षकाची भाषा जणुं कांहीं परक्या भाषेप्रमाणें वाटूं लागते. म्हणून शिक्षकानें त्या विशिष्ट ठिकाणच्या भाषेशीं परिचय ठेवून विद्यार्थ्यांस हळूहळू शिष्टसंमत भाषेंतील शब्दांचा परिचय करून द्यावा.

**शब्दसंग्रहासंबंधी विद्यार्थ्यांच्या अडचणी समजून घेण्याची आवश्यकता :—** मध्यम व कनिष्ठ वर्गांच्या मुलांना शिकविणाऱ्या शिक्षकांनीं व त्याचप्रमाणें खेड्यांतील शिक्षकांनीं खेडवळ किंवा मागसलेल्या वर्गांच्या मुलांच्या शब्दसंग्रहासंबंधी अडचणी समजून घेतल्या पाहिजेत आणि त्यांनीं त्या अडचणींचें निराकरण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. स्वतःच्या शिक्षणक्रमामध्यें व अवांतर वाचनामध्यें शिक्षकाचा ज्या शिष्टसंमत भाषेशीं परिचय झाला असेल तीच भाषा तो उपयोगांत आणतो. अशा वेळीं शिक्षकाला जेव्हां असें आढळून येतें कीं आपलें बोलणें विद्यार्थ्यांस समजलें नाहीं त्या वेळीं तो तेच तेच शब्द पुन्हा पुन्हा मोठ्या स्वरांत म्हणत राहतो आणि विद्यार्थ्यांची इच्छा नसतांनाहि तो ते शब्द विद्यार्थ्यांच्या डोक्यांत शिरवीत असतो. अशा रीतीनें शिक्षकानें पुन्हा पुन्हा शब्दोच्चार केल्यानंतर त्याचें म्हणणें कांहीं विद्यार्थ्यांना थोडथोडें समजतें यांत संशय नाहीं. परंतु अशा परिस्थितींत शिक्षक व विद्यार्थी यांमध्यें मनमोकळेपणानें चर्चा होणे जवळ जवळ अशक्य होतें आणि शिक्षणाचा मुख्य उद्देशच सिद्धीस जात नाहीं. बऱ्याचशा शाळांत शिक्षक हाच बोलण्याचें काम करीत असतो व ज्यांची आत्मविष्करणाची इच्छा आंतल्या आंत दाबली गेली आहे अशीं मुलें शिक्षकाचें एकतर्फी बोलणें निमूटपणें ऐकत बसतात. शिक्षक मुलांना प्रश्न विचारतो व कधीं कधीं तर धमकावणीहि देतो. परंतु असें केलें तरी त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास मुलें क्वचितच धजतात, कारण शिक्षक काय विचारीत आहे हेंहि त्यांस नीटपणें कळत नसतें. म्हणून

मुलांना आत्मविश्वास वाटत नाहीं व तीं उत्तरें देण्याला कांकूं करतात. भाषा-अध्यापन ही कांहीं एकतर्फी होणारी गोष्ट नव्हे. इतर विषयांच्या अध्यापनाप्रमाणें भाषाध्यापनामध्यें नियमितपणें देवाण-घेवाण झाली पाहिजे. योग्य रीतीनें अचूक विचार करण्यास व शुद्ध भाषेंत युक्त रीतीनें आपले विचार मांडण्यास शिक्षकानें मुलांस उत्तेजन दिलें पाहिजे. शिक्षणशास्त्राच्या आधुनिक तत्वांप्रमाणें शिक्षकानें स्वतः फारच थोडें बोललें पाहिजे, त्यानें स्वतःच्या देखरेखीखालीं व मार्गदर्शकत्वाखालीं विद्यार्थ्यांस स्वावलंबनानें कार्य करण्यास प्रवृत्त केलें पाहिजे. असें झालें तरच शिक्षणाचा खरा उद्देश सिद्धीस जाईल.

**विद्यार्थ्यांच्या अडचणी समजून घेण्याची पात्रता शिक्षकांत नसल्यास घडून येणारा परिणाम :–** आपण स्वतः दिलेलें शिक्षण विद्यार्थ्यांच्या बुद्धीच्या आवांक्याबाहेरचें आहे हें शिक्षकांनीं न जाणल्यामुळें व त्याचप्रमाणें शाळेंतील अभ्यासक्रमाकरितां नियुक्त केलेली भाषा शिक्षकांनीं परिणामकारक रीतीनें न शिकविल्यामुळें होणारे परिणाम फार भयंकर स्वरूपाचे असतात. पहिला अनिष्ट परिणाम म्हणजे वेळेचा अपव्यय, कारण शिक्षकानें शिकविलेल्या विषयापैकीं फारच थोडें ज्ञान विद्यार्थी ग्रहण करतात व त्यामुळें शिक्षकाला तीच तीच गोष्ट एकसारखी सांगावी लागते. शिवाय ज्या अर्थी शिक्षकानें शिकविलेला विषय विद्यार्थ्यांना नीट समजत नाहीं त्या अर्थी साहजिकच त्यांना धड्यामध्यें गोडी वाटत नाहीं व शाळा म्हणजे एक कंटाळवाणी व निरुत्साही वातावरणाची जागा आहे अशी त्यांची कल्पना होते. यामुळें तीं मुलें हळूहळू गैरहजर राहूं लागतात, कारण शाळेंतील वेळ त्यांना कंटाळवाणा वाटतो. अशा रीतीनें शाळेंत गैरहजर राहणारीं मुलें जेथें त्यांच्या कार्यप्रवण व क्रीडनोत्सुक मनाला भरपूर वाव मिळेल तिकडे धाव घेतात.

कांहीं कांहीं वेळां शाळा तपासणारे अधिकारीसुद्धां आपल्या नेहमींच्या तपासणीच्या कामाच्या वेळीं असे प्रश्न विचारतात कीं त्या प्रश्नांची भाषा मुलांच्या ग्रहणशक्तीच्या बाहेरची असते व त्यामुळें मुलांना प्रश्नांचीं उत्तरें समाधानकारक रीतीनें देतां न आल्यामुळें परीक्षेच्या निकालावर परिणाम होतो.

अशा तऱ्हेनें शब्दांचा उपयोग अविचारानें केल्यामुळें व शिकविण्याच्या अयोग्य पद्धतींमुळें मुलांचें मातृभाषेचें ज्ञान उथळ व मर्यादित होतें. बऱ्याच शाळांतून मराठीसारख्या प्रादेशिक भाषाशिक्षणाचा पायाच शास्त्रशुद्ध व पद्धतशीर नसतो आणि म्हणून भाषण व लेखन यांमध्यें मुलांचें दौर्बल्य दिसून येतें.

**खेड्यांतील मागसलेल्या विद्यार्थ्यांच्या शाळांतून मराठी भाषेंतील शिष्टसंमत शब्द कसे प्रचारांत आणावे :**— वरील अनिष्ट परिणाम टाळावयाचे असतील, तर शिक्षकानें मराठीच्या अध्यापनाची पद्धतशीर आंखणी केली पाहिजे. ज्या वेळीं खेड्यांतील शिक्षकाला असें आढळून येईल कीं, खेड्यांतील प्रचलित भाषा व शिष्टसंमत ग्रांथिक भाषा यांत पुष्कळ फरक आहे, त्या वेळीं पहिले कांहीं महिने शिक्षकानें खेड्यांतील भाषा योजूनच शिकविण्याचें काम चालू ठेवावें म्हणजे शिकविण्यांत येणाऱ्या विषयाकडे विद्यार्थ्यांचें लक्ष वेधेल व शिक्षक जें जें शिकवील त्यासंबंधी मुलांमध्यें कुतूहल निर्माण होईल. असें असलें, तरी शिक्षकानें शक्य तितक्या लवकर मुलांना शिष्टसंमत भाषेचा थोडथोडा परिचय करून देण्यास सुरुवात केली पाहिजे. शिष्टसंमत भाषेंतील ज्या शब्दांचा उपयोग करण्याची संधि विद्यार्थ्यांस वरच्यावर मिळेल ते शब्दच विद्यार्थ्यांना प्रथम शिकविले पाहिजेत. असें करतांना शिक्षकानें अशी काळजी घेतली पाहिजे कीं, नवीन शिकवलेल्या शब्दांचाच उपयोग योग्य वेळ येतांक्षणींच पुनः केला पाहिजे — त्या गांवांत प्रचलित असलेल्यांचा नव्हे. तसेंच शिक्षकानें विद्यार्थ्यांना एकदम बरेचसे शब्द शिकवूं नयेत, कारण नवीन शब्द ग्रहण करण्याची मुलांची शक्ति मर्यादित असते. शिक्षकाला आपल्या कामाविषयीं जर उत्साह वाटत असेल अथवा तो मातृभाषेचें शिक्षण शिष्टसंमत स्वरूपांत देण्याची आपली जबाबदारी ओळखत असेल, तर त्यानें वाचनांत किंवा संभाषणांत उपयोगांत आलेल्या नवीन शब्दांची नोंद ठेविली पाहिजे. असें केल्यानें नवीन शब्द ध्यानांत ठेवण्याला अल्पवयी विद्यार्थ्यांच्या स्मरणशक्तीला साहाय्य मिळेल; आणि तसेंच आपण किती नवीन शब्द शिकविले, याचा पडताळा शिक्षकाला पाहतां येईल व त्याच त्याच शब्दांची पुनरुक्ति किंवा नवीन शब्दांचा प्रमाणाबाहेर उपयोग टाळतां येईल.

**योग्य शब्दांच्या निवडीला शब्दावल्यांचें मार्गदर्शन :**— मुलांना

शिकविण्याकरितां शब्दांची निवड करण्याच्या मार्गामध्यें ज्या अडचणी येतात, त्या प्रस्तुत वयोवार रचलेल्या शब्दावल्यांमुळें दूर होतील. या यादांवरून शब्दांचें विशिष्ट महत्त्व कळून येईल व त्यामुळें कोणते शब्द शिकविणें आवश्यक आहे, कोणत्या शब्दांकडे विशेष लक्ष देण्याची जरुरी नाहीं व कोणते शब्द पूर्णपणें समजले पाहिजेत याबद्दल शिक्षकाला योग्य बोध होईल. मुलांचा शब्दसंग्रह पुढील रीतीनें वाढवला पाहिजे. प्रत्येक नवीन पाठाच्या वेळीं किती नवीन शब्द शिकवायचे याला मर्यादा घातली पाहिजे. नंतर शिक्षकानें मुलांना नवीन शब्दांचा उपयोग करण्याची संधि इतक्या वेळां दिली पाहिजे कीं, मुलांना त्या शब्दांच्या अर्थांची पूर्ण कल्पना येऊन, त्यांचा योग्य उपयोग करतां येईल. अतिशय उपयुक्त व महत्त्वाचे शब्द प्रथम शिकविले पाहिजेत. अशा रीतीच्या शिक्षणानें मुलांचा शब्दसंग्रह जरुरीइतका तयार होईल. प्रस्तुत वयोवार शब्दावल्यांचा उपयोग कोणत्या वयाच्या मुलांना कोणते शब्द योग्य आहेत हें समजण्यासाठीं होऊं शकेल.

*शिक्षक-परीक्षक यांना होणारा उपयोग – प्रश्नरचना करतांना समर्पक शब्दयोजनेची *आवश्यकता* :– प्राथमिक विद्यार्थ्यांचे शिक्षक-परीक्षक यांना प्रश्नपत्रिकांतील शब्दयोजनेची युक्तायुक्तता ठरविण्याच्या कामीं प्रस्तुत शब्दावल्यांचा बराच उपयोग होऊं शकेल. पुष्कळ वेळां असा अनुभव येतो कीं, प्रश्नपत्रिकेंतील शब्द व शब्दसमूह यांची योजना विद्यार्थ्यांच्या आकलन – शक्तीच्या आटोक्याबाहेरील असते. याचा परिणाम असा होतो कीं, परीक्षेमध्यें विद्यार्थ्याला आपली कर्तबगारी दाखवितां येत नाहीं. याचें कारण मात्र बरेच वेळां त्याला तो विषय येत नसतो हें नसून, प्रश्नपत्रिकेंतील भाषेचें योग्य आकलन न होणें हें असतें. प्रस्तुत वयोवार शब्दसंग्रहांमुळें प्रश्नपत्रिकेकरितां युक्त शब्दांची निवड करण्याच्या कामांतील अडचणी दूर होतील, कारण या शब्दावल्यांवरून प्रश्नपत्रिका काढणाराला निरनिराळ्या वयाच्या विद्यार्थ्यांना कोणते शब्द परिचित असूं शकतील हें नक्की समजून येईल.

---

* 'Four Thousand Important Hindi Words' by J. C. Koenig – Introduction.

वरील समर्पक शब्दयोजनेसंबंधीची अडचण विशेषतः शास्त्रीय विषय, अंकगणित वगैरे परिभाषानिष्ठ विषयांसंबंधीं जास्त भासते. अंकगणित, सृष्टिज्ञान व इतर तत्सम विषय शिकवितांना जर शिक्षकांनीं शब्दयोजना वयोवार शब्द-संग्रहानुसार केली, तर पाठ्यविषयाचें अर्थग्रहण करणें मुलांना फार सुलभ जाईल, कारण त्यांना तीं शास्त्रीय पुस्तकें वाचतांना अडचण उत्पन्न होणार नाहीं. असा एक नेहमींच अनुभव येतो कीं, अंकगणिताचीं उदाहरणें सोडवतांना मुलांना जी अडचण भासते, ती अंकगणिताच्या अज्ञानामुळें नसून उदाहरणांत योजलेल्या विशिष्ट भाषेच्या अज्ञानामुळें उत्पन्न होते. जर सर्व विषयांच्या अध्यापनांत निश्चित व शिष्टसंमत शब्दसंग्रह शक्य तितका उपयोगांत आणला जाईल, तर अध्यापनाच्या मार्गांतील अवास्तव अडचणी शिक्षकाला अधिक योग्य तऱ्हेनें दूर सारतां येतील, व त्याचप्रमाणें कोणत्या अडचणी विद्यार्थ्याला विशेष त्रासदायक वाटतात हेंहि कळून येईल.

**बुद्धिमापन अथवा कार्यक्षमत्वमापन याकरितां मराठींतून प्रश्न तयार करण्याच्या कामीं किंवा इंग्रजी प्रश्नांचें भाषांतर करण्याच्या कामीं शब्दावल्यांचा उपयोग :—** या शब्दसंग्रहांचा उपयोग मुलांना सहज समजतील अशा शिष्टमान्य बुद्धिमापनाच्या परीक्षाप्रश्नांकरितां होऊं शकेल. शब्दयोजनेंतील अगदीं क्षुल्लक निष्काळजीपणामुळेंहि परीक्षाप्रश्नांचा हेतु मुळींच सिद्धीस जाणार नाहीं, कारण अशा परिस्थितींत या प्रश्नांमुळें विद्यार्थ्यांच्या विशिष्ट विषय ज्ञानक्षमतेची परीक्षा न होतां ते प्रश्न म्हणजे भाषाज्ञान अजमावण्याचें एक साधन होतील. मराठी मुलांची परीक्षा घेण्याकरितां अमेरिकेसारख्या पाश्चिमात्य देशांत उपयोग करीत असलेल्या बुद्धिमापनाच्या परीक्षाप्रश्नांचें मराठींत शब्दशः भाषांतर केलें व त्या शब्दप्रयोगांचा व त्यांत वर्णिलेल्या वस्तूंचा इकडील विद्यार्थ्यांस परिचय आहे कीं नाहीं याचा विचार केला नाहीं, तर त्याचा परिणाम असा होईल कीं, मराठी मुलांनीं मिळविलेले गुण इंग्रजी मुलांनीं मिळवि-लेल्या गुणांपेक्षां पुष्कळच कमी दिसून येतील. पण यावरून असें समजून चाला-वयाचें नाहीं कीं, मराठी मुलें इंग्रजी मुलांपेक्षां बुद्धिमत्तेंत फार कमी आहेत; कारण वरील तऱ्हेची परीक्षा मराठी मुलांची बुद्धिमत्ता ठरविण्याची खरी कसोटी नव्हे तर ती एक शब्दसंग्रहज्ञान जाणण्याची कसोटी होय.

***शब्दज्ञान-परीक्षाप्रश्नांकरितां उपयोग*** :– या शब्दावल्यांचा एक फार उत्तम उपयोग होतो तो हा कीं, यांच्या साहाय्यानें निरनिराळ्या वयाच्या विद्यार्थ्यांच्या शब्दसंग्रहाची चांचणी घेतां येते. सातव्या वर्षाच्या विद्यार्थ्यांकरितां परीक्षाप्रश्न तयार करावयाचे आहेत असें समजूं, तर आपल्यास मुलांची परीक्षा सातव्या व आठव्या अशा दोनही वर्षांच्या शब्दसंग्रहांवरून घेतली पाहिजे. म्हणून वरील शब्दावल्यांच्या साहाय्यानें योग्य तऱ्हेचे प्रश्न तयार केले व ते सातव्या वर्षाच्या मुलांना सोडवावयास दिले, तर त्यांच्या उत्तरांवरून तीं मुलें शब्दज्ञानाच्या बाबतींत एकमेकांच्या तुलनेनें जास्त पुढें, बरोबरीचीं कीं जास्त मागें आहेत हें ठरवितां येईल.

***शब्दज्ञानाची परीक्षा घेण्याचे निरनिराळ्या तऱ्हेचे प्रश्न*** :– विद्यार्थ्यांचें इंग्रजी शब्दसंग्रहज्ञान अजमावण्याचे निरनिराळ्या तऱ्हांच्या प्रश्नांचे प्रकार पाश्चिमात्य देशांत अमलांत आहेत. त्यांपैकीं पुढील चार प्रकारांचा प्राधान्यानें उपयोग करण्यांत येतो.

[1]***पहिला प्रकार*** :– ज्या शब्दांच्या ज्ञानाविषयीं परीक्षा घ्यावयाची ते शब्द परीक्षा घ्यावयाच्या विद्यार्थ्याला तोंडीं सांगितले जातात अथवा लिहून दाखविले जातात अथवा कधीं कधीं दोनही तऱ्हांचा अवलंब करण्यांत येतो. नंतर त्या विद्यार्थ्यानें शब्दांची व्याख्या, उपयोग, समानार्थक शब्द, उदाहरण किंवा असाच एखादा अन्य प्रकार यांच्या साहाय्यानें मूळ शब्दांची ओळख आहे हें पटवून द्यावें लागतें. ही परीक्षा वैयक्तिक स्वरूपाची असते.

[2]***दुसरा प्रकार*** :– ज्या शब्दांच्या ज्ञानाविषयीं परीक्षा घ्यावयाची, त्यांच्याबरोबरच चार किंवा पांच इतर शब्द द्यावयाचे ते असे कीं, त्यांतील एक विशिष्ट शब्द मूळ शब्दाची व्याख्या करणारा असतो किंवा समानार्थक तरी असतो. नंतर परीक्षेच्या विद्यार्थ्याला मूळ शब्दासमोरील चार किंवा पांच शब्दांपैकीं मूळ शब्दाचा

---

* Journal of Educational Research, Sept. 1929.

१ Identification Tests.

२ Multiple-Response Tests.

अर्थ दर्शविणाऱ्या शब्दाखालीं रेघ काढावयास सांगावयाची. ही परीक्षा तीन तऱ्हांनीं घेतां येते.

[1](अ) प्रश्नपत्रिकेंतील प्रत्येक ओळींतील पहिल्या शब्दाकडे विद्यार्थ्यांस पाहण्यास सांगून त्याच ओळींत दिलेल्या चारपांच इतर शब्दांपैकीं कोणता शब्द पहिल्या शब्दाशीं समानार्थक आहे किंवा जवळ जवळ समानार्थक आहे हें ठरविण्यास सांगावयाचें व त्या शब्दाचा क्रमांक ओळीच्या शेवटीं लिहावयाचा किंवा त्या शब्दाखालीं रेघ काढावयाची, जसें :–

चक्र  १ मळका, २ उघडा, ३ स्वच्छ, ४ जवळचा ... ३ ...

अथवा

चंद्रोदय (होणें)  खालीं जाणें, चंद्र उगवणें, मावळणें, फिरणें.

[2](आ) प्रश्नपत्रिकेंतील वाक्यांमध्यें एकेक शब्दाची जागा रिकामी असते व तो शब्द वाक्याच्या पुढें दिलेल्या चारपांच इतर शब्दांतून निवडावयाचा असतो, अर्थात् तो शब्द ज्या वाक्यांत योजावयाचा त्या वाक्यांत तो अर्थदृष्ट्या नीट जुळला पाहिजे. त्या निवडलेल्या शब्दाखालीं रेघ काढावयाची असते जसें :–

पावसाच्या आरंभीं·········करतात.  पेरणी, कापणी, झोडणी, निवड.

[3](इ) ज्या शब्दांची परीक्षा घ्यावयाची त्यांतील एकेक शब्द वाक्यांत योजून जाड अक्षरांत लिहावयाचा. प्रत्येक वाक्यासमोर चारपांच शब्द लिहिलेले असावयाचे. त्यांतील जो शब्द जाड अक्षरांतील शब्दाशीं जवळ जवळ समानार्थक असेल तो विद्यार्थ्यांनीं निवडून त्याखालीं रेघ काढावयाची. जसें : –

दिवा बिघडला आहे –  चांगला, पेटत नसलेला, लागला, उघडला.

---

१ Thorndike Test of word-knowledge.
२ Holley Sentence Vocabulary Test.
३ Inglis Test of English Vocabulary.

*तिसरा प्रकार :– ज्या शब्दांची परीक्षा घ्यावयाची ते शब्द एका रकान्यांत दिलेले असतात. दुसऱ्या रकान्यांत त्या शब्दांच्या व्याख्या क्रम बदलून दिलेल्या असतात. विद्यार्थ्यांनीं पहिल्या रकान्यांतील शब्दांची दुसऱ्या रकान्यांत दिलेल्या त्यांच्या योग्य व्याख्यांशीं सांगड घालून त्या व्याख्यांच्या पूर्वीं ज्या शब्दांच्या त्या व्याख्या असतील त्या शब्दांचा क्रमांक घालवयाचा. जसें :–

| | |
|---|---|
| १ पाया | ( ३ ) पुस्तकें असलेली जागा. |
| २ कुंभार | ( १ ) तळचा भाग. |
| ३ पुस्तकालय | ( २ ) मडकीं करणारा. |

†चौथा प्रकार :– ज्या शब्दांची परीक्षा घ्यावयाची ते शब्द एकाखालीं एक असे छापावयाचे. असे शब्द छापलेले कागद विद्यार्थ्यांस देऊन त्यांना ज्या शब्दांची व्याख्या येते किंवा ज्यांचें उदाहरण देतां येतें त्या शब्दांपुढें + ( अधिक ) चिन्ह करावयास सांगावयाचें, ज्या शब्दांचा अर्थ किंवा उदाहरण येत नाहीं त्यांपुढें – ( उणे ) चिन्ह करावयास सांगावयाचें व ज्या शब्दांच्या अर्थाबद्दल संदेह असेल त्यांच्यापुढें ? ( प्रश्न ) चिन्ह करावयास सांगावयाचें. या परीक्षेमध्यें विद्यार्थ्यांस व्याख्या लिहावयास सांगितल्याच पाहिजेत असें नाहीं. [ परिशिष्ट ( आ ) मधील नंबर तीनचे प्रश्न पहा. ]

वरील चार प्रकारच्या परीक्षाप्रश्नांच्या उपयुक्ततेंतील तरतमभाव :– वरील सर्व प्रकारचे परीक्षाप्रश्न पुष्कळ प्रमाणांत विश्वसनीय आहेत. परंतु त्यांतल्या त्यांत पहिल्या प्रकारचे प्रश्न (Identification Tests) हे सर्वोत्कृष्ट आहेत; पण ते वैयक्तिक स्वरूपाचे असल्यामुळें, ज्या वेळीं पुष्कळ मुलांची परीक्षा घ्यावयाची असते त्यावेळीं ते फारसे उपयोगी पडत नाहींत. दुसरा प्रकार ( Multiple-Response Tests ) हा त्याच्या खालोखाल महत्वाचा होय. याशिवाय या परीक्षाप्रश्नांचा हा विशेष गुण आहे कीं ते विद्यार्थ्यांना

* Matching Tests.
† Checking Tests.

फार आवडतात. तिसऱ्या प्रकारचे प्रश्न (Matching Tests) हे शब्दसंग्रहांतील विशिष्ट शब्दांची परीक्षा घेण्याकरितांच उपयोगी पडतात, कारण ज्या शब्दांची व्याख्या करतां येते अशा शब्दांसंबंधींच हे प्रश्न बनवितां येतील. म्हणून या प्रश्नांची उपयुक्तता विशिष्ट शब्दांपुरती मर्यादित असते. चौथ्या प्रकारचे प्रश्न (Checking Tests) हे मुलांना देण्यास व फार मोठ्या प्रमाणावर परीक्षा घेण्यास अत्यंत उपयुक्त आहेत. परंतु या प्रश्नांची उत्तरें देतांना मुलें कदाचित तर्कावरच जास्त भिस्त ठेवतील कीं काय ही भीति असते. म्हणून या तऱ्हेची परीक्षा घेतांना फार खबरदारी घ्यावी लागते. दुसऱ्या तऱ्हेचे प्रश्नहि मुलांना एकापाठी-मागून एक असे लागोपाठ देतां कामा नयेत, कारण मुलांना एकाच प्रकारचें काम करण्याचा कंटाळा येतो. म्हणून या तऱ्हेचे प्रश्न आठवड्यानें किंवा पंधरवड्यानें दिल्यास मुलांची शब्दसंपत्ति जाणण्यास यांचा फार उपयोग होईल.

* **योग्य तऱ्हेचे प्रश्न तयार करण्याची पद्धति** :– शब्दज्ञानाची परीक्षा घेण्याकरितां सर्वसाधारणपणें उपयोगांत येणारा प्रश्नांचा प्रकार वर सांगितल्याप्रमाणें पुढील तऱ्हेचा असतो :– एका बाजूला शब्दांची यादी एकाखालीं एक अशी दिलेली असते व प्रत्येक शब्दासमोर चार-पांच शब्द दिलेले असतात. त्या चार-पांच शब्दांतील ज्या शब्दाचें मूळ शब्दाशीं साम्य असेल तो मुलांनीं निवडावयाचा व त्याचा क्रमांक दिलेल्या जागेंत लिहावयाचा. निवड करावयाकरितां दिलेले चारपांच शब्द, मूळ शब्दापेक्षां समजण्यास कठीण असतां कामा नयेत. त्याचप्रमाणें ते सर्व शब्द व्याकरणदृष्ट्या एकाच जातीचे असावे, म्हणजेच ते एक नाम, दुसरा क्रियापद, तिसरा शब्दयोगी अव्यय अशा स्वरूपाचे असूं नयेत. जसें :– 'जागृत' या शब्दापुढें द्यावयाचे शब्द पुढीलप्रमाणें असूं नयेत – 'गर्दी, उठणें, जागा, दिवसा.' तर ते 'जागृत' हें विशेषण असल्यामुळें विशेषणेंच असावेत. जसें :– 'पडलेला, जागा, झोपलेला, स्वस्थ.'

वरीलसारखे परीक्षाप्रश्न लिखाणांतील उपयोगसातत्यावर आधारलेल्या शब्दसंग्रहासंबंधींच जर बनविण्यांत आले तर मुलांची सर्व प्रकारची एकंदर शब्द-

* 'Achievement Examinations' by Hawkes, page 429.

संपत्ति किती आहे याची अचूक कल्पना येत नाहीं. कारण बोलण्यांत येणारे शब्द व लेखनांत येणारे शब्द यांमध्यें थोड्याफार अंशानें वास्तविक स्वरूपाचा भेद असल्यामुळें दोन्ही प्रकारची शब्दसंपत्ति एकाच तऱ्हेच्या परीक्षाप्रश्नांवरून करून येणार नाहीं. म्हणून परीक्षाप्रश्न वयोवारीनें तयार केलेल्या शब्दावल्यांवर आधारलेले असतील तर त्यांचा उपयोग बोलण्यांत येणाऱ्या व लिहिण्यांत येणाऱ्या अशा दोन्ही तऱ्हांच्या शब्दसंपत्तीचें ज्ञान होण्यास होईल; कारण प्रस्तुत वयोवार शब्दावल्या मुलांना परिचित असलेल्या शब्दांच्या बनवलेल्या आहेत, केवळ लिखाणांतील शब्दांवर आधारलेल्या नव्हेत. परीक्षाप्रश्न बनवितांना पुढील गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे. परीक्षाप्रश्नांमधील प्रत्येक कलम शब्दयोजना, रचना व मांडणी या दृष्टींनीं निर्दोष असलें पाहिजे. परीक्षाप्रश्न वैयक्तिक तऱ्हेचे असावे कीं सामुदायिक तऱ्हेचे असावे हेंहि ठरविलें पाहिजे. त्याचप्रमाणें परीक्षाप्रश्न देण्याची पद्धति, उत्तरें कशीं तपासावीं व तपासणीचा निष्कर्ष कसा काढावा आणि गुणमापन कसें ठरवावें या सर्व गोष्टी स्पष्टपणें दिल्या असल्या पाहिजेत.

**मुलांची वाचनशक्ति मापण्याचे प्रश्न :–** *मुलांची स्वतंत्र वाचनशक्ति किती आहे हें शोधून काढण्याकरितांहि प्रस्तुत शब्दसंग्रहांचा उपयोग करतां येईल. याकरितां एका विशिष्ट वयाच्या शब्दसंग्रहावर पूर्णपणें आधारलेले निरनिराळे उतारे त्या त्या वयाच्या मुलांना त्यांची अर्थग्रहणपूर्वक वाचनशक्ति किती आहे हे अजमावण्याकरितां द्यावे. या रीतीनें एका विशिष्ट वयाच्या विद्यार्थ्यांची अर्थग्रहणपूर्वक वाचनशक्ति किती आहे हें बऱ्याच अंशीं समजून घेतां येईल. यावरून विद्यार्थ्यांला लहान मुलांकरितां लिहिलेलीं सामान्यस्वरूपाचीं पुस्तकें घरीं अथवा शाळेंत किती प्रमाणावर देतां येतील हेंहि ठरवितां येईल.

---

* 'A Reading Vocabulary for the Primary Grades' by Gates-Introduction.

## प्रकरण पाचवें

# शब्दसंग्रहांचा उपयोग ( पुढें चालू )

प्राथमिक शाळांकरितां वाङ्मय लिहिणाऱ्या लेखकांना शब्दसंग्रहांचा उपयोग :– या शब्दावल्यांचा मुख्य उपयोग प्राथमिक विद्यार्थ्यांकरितां व अर्धशिक्षित प्रौढांकरितां पुस्तकें लिहिणाऱ्या लेखकांना होईल. प्राथमिक शाळांच्या वाङ्मयाचे दोन भाग पडतात :- ( १ ) निरनिराळ्या इयत्तांकरितां म्हणून तयार केलेलीं क्रमिक पाठ्यपुस्तकें व ( २ ) पुरवणी-वाचनाकरितां लिहिलेलीं इतर पुस्तकें. शालेय क्रमिक पुस्तकें तयार करितांना पुस्तकांत योजावयाच्या शब्दसंग्रहाकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. अशा तऱ्हेच्या क्रमिक पुस्तकांना अथवा कथा-पुस्तकांना योग्य शब्दांची निवड करणें हें आपल्या देशांत कठीण काम होऊन बसलें आहे, कारण निरनिराळ्या ठिकाणच्या बोलभाषेचें स्वरूप हें पुष्कळ वेळां

शाळेंत चालू असलेली भाषा अथवा शिष्टसंमत भाषा यांच्या स्वरूपाहून पुष्कळ भिन्न असतें. म्हणून हिंदुस्थानांतील प्रादेशिक भाषांसंबंधी अधिकृत व प्रमाणबद्ध शब्दावल्या तयार करण्यांत आल्या, तर वरील अडचणींचें निराकरण तात्कालीन होऊन शब्दांची योग्य निवड करण्याचें काम कठीण होणार नाहीं.

***आधुनिक पाठ्यपुस्तकांच्या रचनेला आधारभूत होणारीं तत्त्वें :–** आधुनिक तऱ्हेचीं पाठ्यपुस्तकें तयार करतांना बहुधा पुढील तत्त्वांचा अवलंब करण्यांत येतो. नवीन शब्दांची संख्या शक्य तितकी मर्यादित असावी हें पहिलें तत्त्व होय. असें असलें तरी पाठ्यपुस्तकांतून मनोरंजक व प्रगतिपर विचारसरणींच्या विषयांचा भरपूर अन्तर्भाव केलेला असला पाहिजे. नवीन शब्दांच्या संख्येला मर्यादा घातल्यामुळें पुष्कळ नवीन शब्द ओळखणें व ते लक्षांत ठेवणें या विषयींची मुलांची जबाबदारी कमी होते व म्हणून विद्यार्थ्याला उताऱ्याच्या अर्थावर लक्ष केंद्रित करतां येतें. बाजवीहून ज्यास्त नवीन शब्दांचा उपयोग केल्यास विद्यार्थी पुष्कळ ठिकाणीं अडखळतात आणि म्हणून उतारा वाचून त्याचा अर्थ समजून घेण्याकडे मुलांचें लक्ष लागत नाहीं. ज्या वेळेला नवीन शब्दांचा उपयोग मर्यादित असतो, त्या वेळीं पुस्तक वाचण्यांत मुलाला गोडी वाटते व म्हणून मूल तेंच तेंच पुस्तक पुन्हा पुन्हा वाचतें. मुलांना शाळेंत वाचण्याकरितां योग्य तऱ्हेचीं व स्वावलंबनानें वाचतां येतील अशीं पुस्तकें मिळूं लागलीं, तर शाळा सोडल्यानंतरहि पुस्तकें वाचणें त्यांना आवडेल व योग्य तऱ्हेच्या पुरवणी-वाचन-पुस्तकांची मागणीहि वाढेल. प्राथमिक शाळेंतील चौथ्या इयत्तेचा अभ्यास संपवूनच ज्या विद्यार्थ्यांना शाळा सोडावी लागते त्या विद्यार्थ्यांना वाचनाची गोडी लागली असेल, तर ते पुन्हा निरक्षरतेमध्यें पडणार नाहींत. यावरून असें विधान करावयास हरकत नाहीं कीं, कठीण शब्दांनीं भरलेलीं पुस्तकें वाचणें ही एक मुलांना त्रासदायक गोष्ट वाटते आणि म्हणून ज्या वाचनाचा हेतु आनंदप्राप्ति आहे अशा तऱ्हेच्या वाचनाच्या संवयींच्या मार्गांतील ही एक मुख्य अडचण आहे.

---

* 'Four Thousand Important Hindi Words' by J. C. Koenig. Introduction.

शब्दसंग्रहाच्या योजनेसंबंधी दुसरें तत्त्व असें आहे कीं, वाचन-पुस्तकांतील प्रत्येक नवीन शब्द इतक्या वेळां योजला पाहिजे कीं, विद्यार्थ्याला तो ओळखतां येऊन त्याचा योग्य अर्थ कळला पाहिजे. नवीन उपयुक्त शब्दांची आवृत्ति कमीत कमी दहा वेळां झाली पाहिजे. प्राथमिक शाळांतील पहिल्या चार वर्षांच्या पुस्तकांमध्यें तीन हजारांहून जास्त नवीन शब्दांचा उपयोग केला गेल्यास तो पुरेसा समजण्यास हरकत नाहीं. सामान्य मनुष्य नेहमींच्या व्यवहारांत सुमारें दोन हजार शब्दांचा उपयोग करीत असतो असें ठरविण्यांत आलेलें आहे. याबरोबरच हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, प्रत्येक नवीन शब्दाची दहा वेळ आवृत्ति होण्यास प्राथमिक शाळांतील सर्व वर्गांकरितां जास्त वाचन-पुस्तकांची सोय केली पाहिजे.

शब्दयोजनेचें तिसरें तत्त्व असें आहे कीं, नेहमींच्या प्रचारांत येणारे शब्द खालील वर्गांच्या पुस्तकांतून योजले पाहिजेत आणि कमी प्रचारांतील शब्द वरच्या इयत्तांच्या पुस्तकांकरितां राखून ठेवले पाहिजेत. त्याचप्रमाणें सर्वसाधारण स्वरूपाचे शब्द हे अतिशय उपयुक्त स्वरूपाचे असले पाहिजेत. सध्यां प्रचारांत असलेलीं पुस्तकें जरी एखाद्या निश्चित शब्दावलीवर आधारलेलीं नाहींत तरीहि पुस्तककर्त्यांनीं पुढील सावधगिरी घेतलेली दिसते ती ही कीं, खालच्या वर्गांचीं पुस्तकें वरच्या वर्गांच्या पुस्तकांपेक्षां समजण्याला सोपीं बनवलेलीं आहेत. अधिकृत अशा शब्दसंग्रहांच्या अभावीं क्रमिक पुस्तकांतील शब्दसंग्रहाची योजना ही केवळ तर्कावरच अवलंबून असणार व कोणत्या वयाला कोणते शब्द योग्य याबद्दलचा तो प्रौढ लेखकाचा तर्क बरेच वेळां चुकीचा असण्याचा संभव जास्त. निरनिराळ्या वाचनपुस्तकांच्या लेखकांचें शब्दयोजनेविषयीं एकमत होईल व ते एक ठरीव, क्रमवार जुळविलेला शब्दसंग्रहच उपयोगांत आणतील, तर त्या वेळीं निरनिराळ्या वर्गांकरितां लिहिलेल्या निरनिराळ्या पुस्तकांमध्यें योजलेला शब्दसंग्रह बऱ्याच अंशीं जुळता राहील. म्हणजे मग विद्यार्थ्यांना नियुक्त पुस्तकाशिवाय इतर पुस्तकमालांचीं पुस्तकें सहज व आवडीनें वाचतां येतील आणि त्यांना वाचनाच्या उत्तम संवयी जडतील. ज्या मुलांना एकदा वाचनाची गोडी लागेल ते बहुधा निरक्षरतेच्या फेऱ्यांत पुन्हा सांपडणार नाहींत.

**भाषाविषयाशिवाय इतर विषयांचीं पुस्तकें तयार करतांनासुद्धां**

**वरील तत्त्वें अमलांत आणण्याची आवश्यकता :–** वरील तत्त्वांप्रमाणें भाषा-विषयाचीं पुस्तकें तयार केलीं पाहिजेत एवढेंच नव्हे, तर शास्त्रीय, इतिहास व भूगोल यांसारख्या इतर विषयांचीं पुस्तकें तयार करतांनाहि वरील तत्त्वांचा अव-लंब विषयविवेचनाला बाध न येईल अशा रीतीनें केला पाहिजे. त्याचप्रमाणें अवांतर किंवा पुरवणी-वाचन-पुस्तकांतील शब्दसंग्रहहि वरील प्रकारच्या शब्दांच्या पायावर आधारलेला असून त्यांतील विषय मुलांना सहजासहजीं आकलन होईल असा असला पाहिजे. अर्धशिक्षितांकरितां लिहिल्या जाणाऱ्या पुस्तकांकरितांहि प्रस्तुत मराठी शब्दावल्यांचा पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. प्राथमिक शाळां-तील मुलांची संख्या व हायस्कुलांमध्यें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या यांची तुलना केल्यास असें आढळून येईल कीं, पुष्कळ विद्यार्थ्यांचें शिक्षण प्राथमिक शाळेबरोबरच संपतें व कांहींचें तर प्राथमिक शिक्षणहि दोन तीन इयत्तांपलीकडे जात नाहीं. अशा विद्यार्थ्यांना हायस्कूलचें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां लिहि-लेलीं पुस्तकें फारशीं उपयोगी पडणार नाहींत. म्हणून केवळ अर्धशिक्षितांकरितां म्हणून लिहिलेल्या पुस्तकांची फार जरुरी आहे व तीं पुस्तकें प्राथमिक शाळांतील तिसऱ्या किंवा चौथ्या इयत्तेंत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना समजतील अशीं असलीं पाहिजेत. प्रस्तुत तयार केलेल्या वयोवार शब्दावल्यांचा अशा पुस्तकांच्या लेखकांना फार उपयोग होईल; कारण त्या याद्यांवरून प्राथमिक शाळांतील विद्या-र्थ्यांना कोणत्या वयाला कोणते शब्द समजतात याची कल्पना येऊं शकेल.

सध्यां प्रसिद्ध होणारें बरेंचसें वाङ्मय सामान्य साक्षर जनतेपैकीं बऱ्याच लोकांच्या बुद्धिमत्तेच्या आटोक्याबाहेरचें व तसेंच शब्दसंग्रहाच्या दृष्टीनेंहि न समजण्यासारखें असतें. एक वेळ अशी होती कीं, त्या वेळीं मराठी लेखक संस्कृतप्रचुर असें मराठी लिखाण लिहिण्यांत पुरुषार्थ मानीत असत. परंतु ही भावना हल्लीं नाहींशी होत चालली असून, सामान्य जनसमूहाला समजेल असें लिखाण रोजच्या व्याव-हारिक भाषेंत लिहिलें जावें याबद्दल प्रयत्न चालू आहेत.

प्राथमिक शाळेंतील विद्यार्थ्यांकरितां पुस्तकें लिहितांना शब्दावल्यांच्या वर सांगितलेल्या उपयोगावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, मराठी व इतर सर्व

प्रादेशिक भाषा यांसंबंधीं शब्दावल्या तयार करणें अत्यंत अगत्याचें आहे. प्रस्तुत प्रयत्नहि अशा प्रयत्नांपैकींच एक आहे. सध्यांच्या प्रचलित प्राथमिक पाठ्य-पुस्तकांच्या लेखकांनीं स्वतःच्या वैयक्तिक समजुतींच्या अनुरोधानें निरनिराळ्या वयाच्या मुलांना कोणते शब्द समजतील याचा विचार करून तशा शब्दांचा उपयोग आपापल्या पुस्तकांतून केलेला आहे. म्हणून त्यांच्या कार्याला थोडेंफार तर्काचेंच स्वरूप आलेलें आहे. फारच थोडे लेखक मुलांच्या शब्दसंग्रहांची नोंद ठेवून त्यांचा उपयोग पुस्तकलेखनाच्या कामीं करतात.

**शाळाखात्याचीं पहिलीं चार क्रमिक पुस्तकें व नवयुगमालेचीं पहिलीं चार पुस्तकें यांतील शब्दसंग्रहाची परीक्षा :—** निरनिराळ्या क्रमिक पुस्तकांचे लेखक असा निर्वाळा देतात कीं, आपलीं पुस्तकें प्राथमिक विद्यार्थ्यांना पूर्णपणें योग्य आहेत व प्राथमिक विद्यार्थ्यांना जरूर असलेल्या सर्व गोष्टींनीं तीं युक्त आहेत. हें म्हणणें कितपत युक्त आहे हें पाहण्याकरितां वयोवार शब्दावल्यांशीं कांहीं पुस्तकांतील शब्दसंग्रह ताडून पाहून काय दिसून येतें हें पाहण्याचें मीं ठरविलें. हें करण्यासाठीं, मी सध्यां जवळ जवळ मागें पडलेलीं परंतु एके काळीं एकमेव सुरू असलेलीं शाळाखात्याचीं पुस्तकें व सध्यां विशेष प्रचारांत असलेलीं अत्रे-घोटे यांनीं लिहिलेल्या नवयुगमालेचीं पुस्तकें ताडून पाहण्याचें निश्चित केलें. या दोन्ही मालांचीं बालपुस्तक व पहिलीं चार पुस्तकें यांतून योजलेल्या शब्दसंग्रहाचें पृथक्करण करून नंतर त्या शब्दसंग्रहाची तुलना मीं तयार केलेल्या शब्दावल्यांशीं केली, तेव्हां पुढील गोष्टी दिसून आल्या.

तुलनेकरितां सहाव्या वर्षाचा शब्दसंग्रह हा बालपुस्तकाच्या योग्य, सातव्या वर्षाचा पहिल्या पुस्तकाच्या योग्य, व याच क्रमानें आठव्या, नवव्या व दहाव्या वर्षाचा शब्दसंग्रह अनुक्रमें दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या इयत्तांच्या पुस्तकाला योग्य असें गृहीत धरलें; कारण सहाव्या वर्षी मुलें बालवर्गांत शिकत असतात व म्हणून दहाव्या वर्षी तीं बहुधा चौथ्या इयत्तेंत असण्याचा संभव असतो.

वयोवार शब्दसंग्रहांच्या मानानें निरनिराळ्या पुस्तकांतील कोणते शब्द मुलांच्या आवांक्याबाहेरचे आहेत हें ठरविण्याकरितां मीं पुढीलप्रमाणें दिशा आंखून

घेतली. पहिल्या पुस्तकांतील शब्दसंग्रह सातव्या वर्षाच्या शब्दसंग्रहानुसार असावा हें योग्य आहे. ज्या अर्थी मुलांना शिकवितांना त्यांच्या शब्दसंग्रहांत भर घालणें उचित आहे, त्या अर्थी आठव्या वर्षाच्या शब्दसंग्रहांतील शब्दांचा अन्तर्भाव पहिल्या पुस्तकांत करण्यास हरकत नाहीं. म्हणून पहिल्या पुस्तकांतील जे शब्द सातव्या व आठव्या वर्षाच्या शब्दसंग्रहांत दिसले नाहींत ते वयाच्या मानानें कठीण असें मी मानलें.

वयोवार शब्दावल्यांशीं क्रमिक पुस्तकांतील शब्दसंग्रहाची तुलना **करून दिसून आलेला निष्कर्ष :—** क्रमिक पुस्तकांतील शब्दसंग्रह व वरील वयोवार शब्दसंग्रह यांच्या तुलनेवरून ज्या गोष्टी दिसून आल्या त्यांचा विस्तृत तपशील पुढें दिला आहे.

| | शालाखात्याची पुस्तकमाला | नवयुग-माला |
|---|---|---|
| **बालपुस्तक** | | |
| आठव्या वर्षाच्या शब्दावलींतील शब्द | ४८ | २८ |
| नवव्या ,, ,, ,, | २० | ११ |
| दहाव्या ,, ,, ,, | ११ | ८ |
| शब्दावल्यांत नसलेले ,, | ३९ | १९ |
| वयाच्या मानानें कठीण शब्द | ११८ | ६६ |
| **पहिलें पुस्तक** | | |
| नवव्या वर्षाच्या यादींतील शब्द | ७२ | ४१ |
| दहाव्या ,, ,, ,, | ७८ | २२ |
| शब्दावल्यांत नसलेले ,, | १९० | ५९ |
| वयाच्या मानानें कठीण शब्द | ३४० | १२२ |
| **दुसरें पुस्तक** | | |
| दहाव्या वर्षाच्या यादींतील शब्द | ८० | ७० |

| | | |
|---|---|---|
| शब्दावल्यांत नसलेले | ३५१ | ९७ |
| वयोमानानें कठीण शब्द | ४३१ | १६७ |

तिसरें पुस्तक

| | | |
|---|---|---|
| शब्दावल्यांत नसलेले शब्द | ६०० | २७५ |

चौथें पुस्तक

| | | |
|---|---|---|
| शब्दावल्यांत नसलेले शब्द | १०३५ | ४२२ |

वरील दोन्ही मालांतील पुस्तकांच्या शब्दसंग्रहांची छाननी करून वयाच्या मानानें जे शब्द कठीण दिसून आले त्यांची त्या त्या वयाच्या शब्दावल्यांशीं तुलना केली तेव्हां वयोमानानें कठीण असलेल्या शब्दांची शेकडेवारी पुढीलप्रमाणें दिसून आली :–

| | शाळाखात्याची माला | नवयुगमाला |
|---|---|---|
| बालपुस्तक | २३ टक्के | १३ टक्के |
| पहिलें पुस्तक | २९ ,, | १० ,, |
| दुसरें ,, | २२ ,, | ८ ,, |
| तिसरें ,, | २१ ,, | ९ ,, |
| चौथें ,, | २५ ,, | १० ,, |

वयाच्या मानानें कठीण शब्दांचे नमुने :– वरील दोन्ही पुस्तकमालांतील शब्दसंग्रहांची छाननी केली व वयोवार शब्दावल्यांशीं त्यांची तुलना केली

त्या वेळीं वयोमानानें कठीण असे निरनिराळ्या पुस्तकांतून जे शब्द दिसून आले त्यांतील कांही थोडे नमुन्यादाखल पुस्तकवारीनें पुढें दिले आहेत.

शाळाखात्याची पुस्तकमाला – बालपुस्तक :–

१ भाववाचक व इतर दुर्बोध शब्द :–
खबर, कसरत, माया, तडफडणें, काळजी, लोभी, वांचविणें, कशिदा, उपकार, दया, सुख.

२ वाचनाच्या संवयीकरितां दिलेले शब्द :– औत, हौस, वैरण, लालभडक, काळाकुळकुळीत, फौजदार, हौलदार.

नवयुगमाला – बालपुस्तक :–

१ वयाच्या मानानें कठीण वाटणारे, परंतु समजण्यास सोपे असे शब्द :– मिळणें, पोहणें, फुलणें, कमळ, वळणें, मागणें, निसटणें, फेरीवाला, खोल, चिडणें, वनणें, गिधाड, चिरेबंदी.

२ वाचनाच्या संवयीकरितां दिलेले शब्द :– भरभर, धबधबा, सतार, सुतार, बाप, बापू, रुमझुम, भुरकन, हमला.

शाळाखात्याचें पहिलें पुस्तक :–

१ सातव्या वर्षाच्या मुलांच्या आकलनशक्तीच्या बाहेरचे पुष्कळसे शब्द :– अदबी, उतराई होणें, कळकळ, कल्याण, ताटवा, तोकडा, धुमारा, बहार, बिलगणें, वाखाणणें, योगायोग, पागोळी.

२ संस्कृत शब्द :– आराम, उपचार, गीत, चित्त, जीवन, दीन, वेदना, वृक्ष, स्नान, मर्यादा, वंदणें.

नवयुगमाला – पहिलें पुस्तक :–

१. खेड्यांतील जीवनासंबंधी जाणण्यास आवश्यक असे शब्द :– आवार, ओंझी, ताटवा, वाफा, सडक, नवसा, सडणें.

२. भावनावाचक व इतर कठिण शब्द :– मोहक, ओशाळणें, करमणें, झटणें, नाजुक, साजणें, पिंजणें.

शाळाखात्याचें दुसरें पुस्तक :–

१. संस्कृत शब्द :– आल्हाद, आक्रोश, कन्या, पुष्प, मेघपंक्ति, आयास, सत्वर, संवत्सर, तृण.

२. खेड्यांतील वातावरणासंबंधीं शब्द :– आंबराई, मशागत करणें, फाळ, लोंबी.

३. भाववाचक व इतर कठिण शब्द :– अनर्थ, उतावीळपणा, कींव, निगा, फायदा, योग्यता, चातुर्य, आकांत करणें, गैदीपणा, धिक्कार करणें, पडछाया, कब्जा, मुलामा, समजूत, निकरावर येणें.

नवयुगमाला – दुसरें पुस्तक :–

बरेचसे शब्द नित्याच्याच सामान्य व्यवहारासंबंधीं असल्यामुळें समजण्यास सोपे आहेत.

१. संस्कृत शब्द :– कल्लोळ, सत्वर, अपाय, स्थिर, वसंत.

२. भाववाचक व इतर कठिण शब्द :– अदत्री, ओढ, करुणा, केविलवाणा, धमक, हळहळणें.

शाळाखात्याचें तिसरें पुस्तक :–

१. संस्कृत शब्द :– प्रतिज्ञान, बोध, दृष्टि, विश्वास, स्थिति, वासना, कौतुक, क्रीडा, सुशील, भंग, आदरसत्कार, सिद्धि, प्रशंसा, प्रतिष्ठा.

२. भाववाचक शब्द :– सावधगिरी, उपद्रव, उतावीळपणा, आभार, लोभ, कल्पना, वेदना.

३. इतर कठिण शब्द : – सद्दूं लागणें, चोखणें, खोरें, ओसरणें, आघात, विवंचना, चौकस, पाणउतारा, मढवणें, बट्टा.

नवयुगमाला – तिसरें पुस्तक :–

१. संस्कृत शब्द :– अहोरात्र, कौशल्य, प्रशंसा, पश्चात्ताप, चिंता, उषःकाल, धेनु, नभ.

२. भाववाचक शब्द :– उदास, भांबावणें, झुरणें, खुलणें, कींव.

३. इतर कठिण शब्द :– कबजा, कर्दनकाळ, तुच्छ, घायाळ, डावपेंच, मनसुबा, मलूल.

४. खेड्यांतील जीवनासंबंधी शब्द :– अडवी, आचार, औत, ओंरी, कळक, खिल्लारीं, दरड, फाळ, वाफा.

शाळाखात्याचें चौथें पुस्तक :–

१. संस्कृत शब्द :– चिन्ताक्रान्त, निराधार, क्षुधेन्द्र, प्रवृत्ति, अहर्निश, नक्र, जलमग्न, अशाश्वत, उत्कर्ष, वाक्चातुर्य.

२. भाववाचक शब्द :– आवेश, बेअदबी, मत्सर, खुर्मी, धास्ती, औदार्य, उसासा, नैपुण्य, हेवा, चाणाक्षपणा, आल्हाद.

नवयुगमाला – चौथें पुस्तक :–

१. संस्कृत शब्द :– अतिशयोक्ति, तृप्त, त्वेष, त्वरा, निष्ठा, प्रपात, दुर्धर, तटिनी, निर्झर, विकास, व्योम.

२. भाववाचक व 'इतर कठिण' शब्द :– हर्ष, उदात्त, कानउघाडणी, उदासीन, उत्कंठा, वैतागणें.

३. खेड्यांतील जीवनासंबंधी वरेच शब्द असून ते समजण्यास सोपे आहेत.

वरील तुलनेवरून काढलेला निष्कर्ष :–

दोनही मालांच्या पुस्तकांतील शब्दांचें वर्गीकरण व छाननी वरीलप्रमाणें करण्यांत आली आहे. त्यावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, विद्याखात्याच्या

पुस्तकांची भाषा बालमनाला व बुद्धीला पेलणारी नाहीं, कारण त्यांमध्यें वयाच्या मानानें कठिण, संस्कृत व भाववाचक अशा शब्दांचा भरणा फार मोठा आहे. नवयुगमालेतील शब्दसंग्रह मात्र प्रस्तुत संशोधनावर आधारलेल्या शब्दावल्यांच्या जवळजवळ सारखा आहे व त्यामुळें तो प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांना योग्य आहे.

विद्याखात्याच्या चौथ्या पुस्तकामध्यें संस्कृत शब्दांचा व विद्वत्तानिदर्शक शब्दांचा फार मोठा भरणा आहे. परंतु नवयुगमालेच्या चौथ्या पुस्तकांत त्या मानानें संस्कृत शब्द पुष्कळ कमी असून, वयाच्या मानानें कठिण दिसणारे शब्दहि सामान्य विद्यार्थ्याला समजण्याला सोपे आहेत. शिवाय नवयुगमालेच्या पुस्तकांत खेड्यांतील जीवनासंबंधींचे शब्द जास्त प्रमाणावर आहेत व ही गोष्ट लेखकांनीं मुद्दामच केलेली आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें मराठी भाषेचें शिष्टसंमत व निश्चित असें स्वरूप शालेय पुस्तकांतून मनोरंजकतेला बाध न आणतां राखणें इष्ट आहे, या गोष्टीची जाणीव या मालेच्या लेखकांना आहे असें दिसतें. खेडीं व शहरें येथील प्राथमिक शाळांकरितां निरनिराळीं पुस्तकें असणें हे केव्हांहि इष्ट होणार नाहीं. खेडेगांव व शहर यांमध्यें आपल्याला वाङ्मयद्वाराच स्नेहबंधन निर्माण करावयाचें आहे, कारण त्यामुळें खेडेगांवचे रहिवासी व शहरांतील रहिवासी यांमधील अंतर कमी होण्याला मदत होईल. म्हणून शहरांतील मुलांना खेडेगांवच्या राहणीसंबंधींचे कांहीं धडे शिकविणें हें जसें इष्ट आहे, तसेंच खेड्यांतील मुलांना शहरांतील राहणीसंबंधीं कांहीं पाठ शिकविणें इष्ट आहे. या दृष्टीनेंहि विचार केला तर दोनही तऱ्हांचे पाठ विद्यार्थ्यांच्या पाठ्य पुस्तकांत अंतर्भूत करण्यांत नवयुगमालेला यश आलें आहे. शाळाखात्याच्या पुस्तकांमध्यें दुसरें एक महत्त्वाचें वैगुण्य दिसून येतें. कांहीं कांहीं पाठांमध्यें कठिण शब्दांचा उपयोग फार मोठ्या प्रमाणावर केलेला आहे. उदाहरणार्थ — चौथ्या पुस्तकांतील पहिल्याच धड्यांत पन्नासाहून जास्त कठिण शब्द असून तीस ते पस्तीस कठिण शब्द असलेले पाठ बरेच आहेत. हीच स्थिति दुसऱ्या व तिसऱ्या पुस्तकांसंबंधींहि दिसून येते. पुष्कळशा धड्यांतून वयाच्या मानानें कठिण अशा तीस ते पस्तीस शब्दांचा उपयोग केलेला आहे. पहिल्या पुस्तकांतहि वीस ते पंचवीस कठिण शब्दांचा उपयोग केलेले असे बरेच पाठ आहेत.

या दृष्टीनें विचार करतां, नवयुगमालेची गोष्ट निराळी आहे. प्रत्येक पाठांत बहुधा पंधरा ते वीस शब्दांहून जास्त नवीन शब्द नाहींत. शिवाय नवीन शब्दांचा उपयोग पाठांतून वरच्या वर केलेला आहे. त्यामुळें ते शब्द विद्यार्थ्यांच्या मनांत ठाम बसतात. तथापि यावरून असें म्हणतां येणार नाहीं कीं, नवयुगमाला नवीन शब्द जास्त प्रमाणांत योजण्याच्या कामीं सर्वस्वी निर्दोष आहे; कारण तिसऱ्या पुस्तकांतील सातव्या पाठांत पुष्कळसे नवीन कठिण शब्द आहेत. तसेंच चौथ्या पुस्तकाच्या अठ्ठाविसाव्या पाठांतहि आहेत. परंतु असे पाठ मात्र अपवादात्मकच आहेत.

**शाळाखात्याचीं पुस्तकें कठिण होण्याचीं कारणें :–** शाळाखात्याचीं पुस्तकें कठिण होण्याचें एक कारण असें असावें कीं, तीं मुद्दाम निश्चित धोरणानुसार लिहवून घेतलेलीं होतीं. कांहीं विशिष्ट नमुन्यांचे धडे पुस्तकांत घालावयाचे होते व त्याला अनुसरून ज्यांच्याकडे पुस्तकें लिहिण्याचें काम सोंपविलें गेलें, त्यांनीं ती कामगिरी आपापल्या दृष्टिकोनाप्रमाणें अगदीं तंतोतंत बजावली. ज्या विद्यार्थ्यांच्या हातांत तीं जावयाचीं होतीं, त्यांना पेलणाऱ्या शब्द-संग्रहाचा फारसा विचार न करतां फक्त 'काय' शिकवावयाचें याकडेच त्यांनीं लक्ष पुरविलें असावें असें दिसतें. शिवाय, त्या वेळीं मानसशास्त्रांच्या तत्त्वानुसार अध्यापन-शास्त्राचा सांगोपांग विचारहि हल्लींच्या इतका झालेला नव्हता. ज्या लेखकांचा बालविद्यार्थ्यांशीं प्रत्यक्ष संबंध क्वचितच येतो, त्यांच्या हातून प्रौढांना योग्य अशा शब्दांचाच उपयोग केला जातो व त्यामुळें साहजिकच अशीं पुस्तकें विद्यार्थ्यांना आवडेनाशीं होतात. कधीं कधीं सगळेंच्या सगळें पुस्तक अथवा त्यांतील कांहीं भाग हा त्या त्या विषयांतील तज्ज्ञ लोकांकडून लिहविला जातो व अशा तज्ज्ञांचें लक्ष विषयाच्या ज्ञानवृद्धीकडेच जास्त असतें. ते योग्य शब्दांच्या निवडीकडे फारसें लक्ष देत नाहींत.

*** योग्य प्रकारचीं पाठ्य पुस्तकें कशीं तयार करवून घ्यावीं ? –** जर योग्य अशीं क्रमिक पुस्तकें तयार करवून घ्यावयाचीं असतील, तर विशिष्ट विषयांत प्रवीण असलेले विद्वान व शिक्षणशास्त्रज्ञ या दोघांचाहि या कामीं उप-

* Journal of Educational Research – Sept. 1926.

योग करून घेतला पाहिजे. कारण विशिष्ट विषयांतील तज्ज्ञ लेखक पुस्तकांतील मजकुराचें तर्कशुद्ध, शास्त्रशुद्ध व विषयनिष्ठ स्वरूप निश्चित करील, तर दुसरा शिक्षणशास्त्रज्ञ लेखक त्याच गोष्टी योग्य भाषेच्या व रचनेच्या कोंदणांत बसवील. कारण त्याला मुलांच्या शब्दसंग्रहाचें ज्ञान असेल एवढेंच नव्हे, तर मुलांच्या मनाचा ओढा कोणत्या गोष्टींकडे असतो व कोणत्या आकर्षक गोष्टींनीं मुलें कार्यप्रवृत्त होतात याचेंहि त्याला ज्ञान असतें. शब्दसंग्रहाचा फार मोठा बोजा पुस्तकांत दिसून येणें, ही गोष्ट पाठ्य पुस्तकाच्या रचनेंतील उणिवांची निदर्शक आहे. प्रौढ वाचकांना योग्य अशा शब्दसंग्रहाचा पुस्तकांत अन्तर्भाव झाला, म्हणजे त्याचा परिणाम पुस्तकांतील विचारसरणीवरहि झाल्यावांचून राहत नाहीं. म्हणून कोणत्याहि पुस्तककर्त्याला ज्या विद्यार्थ्यांकरितां तो पुस्तक लिहीत असेल, त्यांच्या शब्दसंग्रहज्ञानाची जाणीव विषयाच्या ज्ञानाबरोबरच असली पाहिजे. कारण वयोवार शब्दसंग्रहाची माहिती असली, म्हणजे त्या त्या शब्दांचा क्रमवार उपयोग करणें, आरंभीं नवीन शब्दांची वरच्या वर आवृत्ति करणें, व त्याच शब्दांचा पुस्तकांतील पुढील पाठांत उपयोग करणें पुस्तकलेखकाला शक्य होईल.

नवीन कठिण शब्दांची संख्या मर्यादित असल्यास पुष्कळ फायदे होणें शक्य असतें. विद्यार्थ्यांना पुस्तकांतील विषय चटकन समजतो, व म्हणून ते पुस्तकें लवकर वाचून संपवतात; आणि साहजिकच त्याच तऱ्हेचीं तितकींच सोपीं इतर पुस्तकें वाचण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते व त्यामुळें त्यांचें ज्ञानहि वाढतें. विशिष्ट शब्द व वाक्प्रचार यांचें ज्ञानहि दृढ होतें. कारण नवीन शिकावयाच्या शब्दांची संख्या थोडी असते, व त्यामुळें त्यांचाच उपयोग वरच्यावर केला जातो.

**योग्य तऱ्हेच्या वाचनसाधनांची जरुरी :–** सध्याच्या काळाची अति जोराची निकड ही आहे कीं, अधिकृत शब्दसंग्रहांवर आधारलेलीं पुस्तकें तयार करणें. अशा तऱ्हेचें मुलांना योग्य असें वाङ्मय तयार झाल्यास, खेड्यांतील मुलांनाहि शाळा सोडल्यावर अशीं पुस्तकें मोठ्या प्रमाणावर वाचावयाची इच्छा होईल, व या प्रकारें तीं मुलें सध्यांप्रमाणें निरक्षरांच्या गटांत पुन्हा सामील होणार नाहींत.

*निरक्षरतेचें खरें कारण* :– निरक्षरतेच्या संकटाचें निर्मूलन करण्याच्या कामीं ज्या अडचणी पुढें करण्यांत येतात, त्यांत दारिद्र्य ही एक आहे. कांहीं दुसऱ्या लोकांचें मत असें आहे कीं, प्राथमिक शाळांतील शिकविण्याच्या पद्धति व अध्यापनाला साहाय्यभूत होणाऱ्या उपकरणांचा अभाव या कारणांमुळेहि साक्षरतेचें एवढें कमी प्रमाण आहे. परंतु शिक्षणप्रसाराच्या मार्गातील खऱ्या अडचणी शोधण्यासाठीं एखादा मनुष्य जर वर वर विचार न करतां थोडासा खोल विचार करील तर त्याला असें आढळून येईल कीं, प्राथमिक शाळांतील चौथ्या इयत्तेच्या मुलांची शैक्षणिक तयारी व बौद्धिक पात्रता यांचा विचार करुन लिहिल्या गेलेल्या पुस्तकांचा अभाव हेंच अतिशय महत्त्वाचें कारण होय. स्वस्त छपाई व दळणवळणाची सुलभता असलेल्या सध्यांच्या युगामध्यें सामान्य जनसमूहाशीं वरच्या लोकांचा संबंध रेड क्रॉस सोसायटी, सेफ्टी फर्स्ट असोसिएशन, ह्यूमनिटेरिअन लीग अशांसारख्या सार्वजनिक हितसंवर्धक सभांच्या माहितीनें भरलेल्या पत्रकांच्या द्वारा येत असतो. अशा छापलि पत्रकांतील शब्दसंग्रहाची प्रस्तुत वयोवार शब्दसंग्रहांबरोबर तुलना केली व क्वचित् उपयोगांत येणारे सर्व शब्द काढून टाकले किंवा बदलले, तर अशा संस्थांच्या पत्रकांचें उद्दिष्ट पुष्कळ प्रमाणावर साध्य होईल. कारण अशा पत्रकांचा सामान्यतः जितक्या लोकांना उपयोग होतो, त्यापेक्षां पुष्कळ जास्त लोकांना उपयोग होईल.

हल्लींच्या क्रमिक पुस्तकांचे लेखक ही गोष्ट लक्षांत घेऊन आपलीं पुस्तकें लिहूं लागले आहेत, हें एक आशाजनक चिन्ह आहे. परंतु त्यांचे हे प्रयत्न मराठी भाषेचा वयोवार शब्दसंग्रह अथवा उपयोगसातत्यावर आधारलेल्या मराठी शब्दांच्या याद्या किंवा मुलांची भाषाविष्कारक्षमता दर्शवणारे नमुने यांच्या अभावीं व्हावेत तितके यशस्वी होणार नाहींत. प्रस्तुत वयोवार शब्दावल्या या कामीं बऱ्याचशा उपयोगी पडतील अशी खात्री वाटते.

## प्रकरण सहावें

# बालविद्यार्थ्यांच्या लेखनाचें स्वरूप

**मुलांच्या लेखनशक्तीसंबंधी संशोधन :—** आतापर्यंतच्या विवेचनाचा विषय मुंबईतील प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांची मराठी शब्दसंपत्ति हा होता. भाषाप्रभुत्वाच्या विविध अंगांचें मूळ शब्दसंपत्तींत आहे हें यापूर्वी दर्शविण्यांत आलेलेंच आहे. शब्दसंपत्तीच्या बरोबरीनें भाषाप्रभुत्वाची दुसरी महत्त्वाची बाब, म्हणजे विद्यार्थ्यांची भाषणद्वारा अथवा लेखनद्वारा आत्माविष्कार करण्याची शक्ति ही होय. कारण मूल केवळ शब्दांचा संग्रह व्हावा म्हणून शब्द शिकत नाहीं, तर संधि मिळतांक्षणींच अगदीं लहान वयामध्येंहि तें शब्दांचा उपयोग भाषणांत करून पाहतें व नंतरच्या वयामध्यें त्या शब्दांचा लेखनांत उपयोग करूं लागतें. लेखन-शक्तीसंबंधींचें प्रस्तुत संशोधन हें शब्दसंपत्तीच्या संशोधनाचा आवश्यक भाग होत नसून, तें त्या संशोधनाला पुरवणीवजा म्हणून करण्यांत आलें आहे. प्राय-

मिक विद्यार्थ्यांमध्यें निरनिराळ्या वयोमानाच्या वेळीं लेखनशक्ति कशी वाढत जाते व शब्दसंपत्तीचा लेखनशक्तीवर कसा परिणाम होत जातो हें जाणण्याच्या उत्कट उत्सुकतेमुळें मुंबईतील म्युनिसिपल शाळांत शिकणाऱ्या, सात ते दहा वयाच्या सुमारें चारशें विद्यार्थ्यांचें लेखन तपासून संशोधन करावयाचें मी ठरविलें. म्हणून वर उल्लेख केलेल्या मुलांना 'मला आवडणारा खेळ' ह्याविषयीं जें कांहीं लिहितां येईल तें चाळीस मिनिटांच्या अवधीमध्यें लिहावयास सांगितलें. ह्या वेळीं मुलांना कोणत्याहि प्रकारच्या सूचना देण्यांत आल्या नाहींत अथवा विषयासंबंधी मुद्देहि पुरवण्यांत आले नाहींत. 'तुम्हाला आवडेल त्या रीतीनें जें जें लिहिण्याचें मनांत येईल, तें तें सर्व चाळीस मिनिटांत लिहा' एवढीच एक सूचना मुलांना देण्यांत आली. नंतर मुलांनीं लिहिलेले कागद जमवून त्यांचे वयानुसार गट केले, व पुन्हा प्रत्येक गटाची इयत्तावार विभागणी केली.

* **लेखनाचें गुणमापन कसें करावें ?** :– लेखनाचें गुणमापन करतांना लिहिण्याची गति, विषयाचा अनुरूपणा व लेखनगुणसंपन्नता या तीनही गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें, म्हणजेच लेखनाचा विषय व मांडणी या दोनही गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतात. अशा तऱ्हेच्या तपासणीनें आपल्या मुलांचें भाषाविषयक ज्ञान व शिक्षणसंपादनक्षमता या दोनही गोष्टी अजमावतां येतात. याच दोन गोष्टींना लेखनतंत्रप्रधान वैशिष्ट्य व सौंदर्यप्रधान वैशिष्ट्य असेंहि म्हणतां येईल.

**तंत्रप्रधान वैशिष्ट्य पुढील गोष्टींवर अवलंबून असतें** :–

१. सुवाच्य व टापटिपीचें अक्षर,

२. शुद्धलेखन व विरामचिन्हांचा उपयोग,

३. व्याकरणदृष्ट्या बिनचूकपणा, व

४. प्रवाहित्व.

---

* 'Measuring Devices in Composition, Spelling and Arith.' by Boyd – page 59.

सौंदर्यप्रधान वैशिष्ट्य पुढील गोष्टींवर अवलंबून असतें :—

१. अचूक शब्दयोजना,

२. वाक्यांशांची योग्य जुळणी,

३. सुंदर वाक्यरचना, व

४. वर्ण्यविषयाची परिणामकारक मांडणी.

**निरनिराळ्या दृष्टींनीं लेखनाचें पृथक्करण :—** लेखनाच्या गुणमापनाच्या वरील मुद्द्यांना अनुसरून मी पुढील गोष्टींकडे लक्ष देऊन मुलांचें लेखन तपासलें, व त्याचें पृथक्करण केलें :—

१. शुद्धलेखन,

२. विरामचिन्हें,

३. वाक्यांचे प्रकार व उभयान्वयी अव्ययें,

४. लेखनाची लांबी,

५. लेखनांतील शब्दांची सरासरी संख्या,

६. सर्वांत लांब असणाऱ्या वाक्यांतील शब्दसंख्या,

७. विषयाची युक्तता व मांडणी, आणि

८. शब्दसंग्रहाचा उपयोग व त्याची पुढीलप्रमाणें वर्गवारी :—

(अ) नामें व त्यांची निरनिराळ्या विभक्तींची रूपें,

(आ) सर्वनामें व ,, ,, ,, ,,

(इ) क्रियापदें व कृदन्त रूपें,

(ई) क्रियाविशेषणें, आणि

(उ) शब्दयोगी अव्ययें.

वरील तपशिलाप्रमाणें दिसून आलेला निष्कर्ष :–

१ शुद्धलेखन :– बहुतेक चुका ऱ्हस्व-दीर्घ स्वर, न् व ण् आणि श् व ष् हीं व्यंजनें आणि संयुक्त व्यंजनें यांसंबंधींच्या होत्या. वरील सर्व चुकांचें मुख्य कारण पुढील गोष्टींचा अभाव हे होय :– १ योग्य तऱ्हेचे उच्चार, २ विशिष्ट व्यंजनांच्या उच्चारांची आवृत्ति, व ३ अगदीं प्राथमिक दशेमध्यें जडणें आवश्यक असणाऱ्या योग्य तऱ्हेनें ऐकण्याच्या संवयी. जसें :– किं, ऊभें, मीळेल, पहील्या, जावुन, करायचां, पियालों, जायाचे, घेयचें, विसरान्ती इ. वरील चुका थोड्याफार अंशीं सर्व वयाच्या मुलांच्या ( विशेषतः मध्यम व कनिष्ठ वर्गाच्या ) लेखनांत दिसून आल्या.

२ विराम-चिन्हें :– सातव्या वर्षाच्या मुलांच्या लिखाणांत विरामचिन्हांचा पूर्णपणें अभाव होता. आठव्या व नवव्या वर्षाच्या बऱ्याच विद्यार्थ्यांनीं वाक्यांच्या शेवटीं पूर्ण विराम दिलेला होता. दहाव्या वर्षाच्या कांहीं मुलांच्या लेखनामध्यें स्वल्प विरामाचाहि उपयोग केलेला होता. या विशिष्ट निबंधलेखनामध्यें प्रश्न-चिन्ह किंवा उद्‌गार-चिन्ह यांच्या उपयोगाला मुळींच वाव नसल्यामुळें त्यांचा उपयोग दिसून आला नाहीं. विराम-चिन्हांच्या योग्य उपयोगासंबंधीं लहान मुलांमध्येंच नव्हे तर प्रौढ वयाच्या विद्यार्थ्यांमध्येहि जें अज्ञान दिसून येतें, त्याचें कारण हें की, निबंधलेखनाच्या या विशिष्ट अंगावर आवश्यक तितका जोर दिला जात नाहीं. पाठ्य पुस्तकांतील निरनिराळ्या पाठांतून उपयोग केलेल्या विराम-चिन्हांकडे जर विद्यार्थ्यांचें लक्ष वेधण्यांत आलें व त्या त्या विशिष्ट विराम-चिन्हांचा त्या त्या ठिकाणीं कां उपयोग केलेला आहे हें जर स्पष्ट करण्यांत आले, तर विद्यार्थ्यांच्या लिखाणामध्यें अशा तऱ्हेच्या विराम-चिन्हांच्या बाबतीत चुका होणार नाहींत.

३ वाक्यांचे प्रकार व उभयान्वयी अव्ययें :–सातव्या वर्षाचीं मुलें बहुतेक केवल वाक्यांचाच उपयोग करतात. कधीं कधीं 'आणखी' हा शब्द वाक्यांच्या आरंभीं वरच्या वर योजलेला दिसून येतो. आठव्या व नवव्या वर्षाच्या मुलांच्या लिहिण्यांत केवल वाक्यें व सोपीं सोपीं मिश्र वाक्यें

दिसून येतात; व तीं वाक्यें 'कीं, जर-तर, असा कीं' इत्यादि उभयान्वयी अव्ययार्थी शब्दांनीं जोडलेलीं असतात. दहाव्या वर्षाचीं मुलें जास्त अवघड अशीं मिश्र व संयुक्त वाक्यें योजतात; व तीं वाक्यें 'जेव्हां-तेव्हां, किंवा, कारण, म्हणून' यांसारख्या उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं असतात.

**४ लिखाणाची लांबी :**— सातव्या वर्षाचें मूल पांच-सहा ओळी लिहितें, आठव्या वर्षाचें सात-आठ ओळी, नवव्या वर्षाचें नऊ-दहा ओळी, आणि दहाव्या वर्षाचें मूल बारा-चौदा ओळी लिहितें.

**५ योजलेल्या शब्दांची सरासरी संख्या :**— सातव्या वर्षाच्या मुलांच्या लेखनांत तीस शब्द, आठव्या वर्षाच्या अडतीस शब्द, नवव्या वर्षाच्या एकोणपन्नास शब्द आणि दहाव्या वर्षाच्या मुलांच्या लेखनांत त्र्यहात्तर शब्द दिसून आले.

**६ प्रदीर्घ (longest) वाक्यांतील शब्दसंख्या :**— सातव्या वर्षाच्या मुलांच्या लेखनांतील प्रदीर्घ वाक्यांत चार ते सहा शब्द, आठव्या वर्षाच्या सात ते आठ शब्द, नवव्या वर्षाच्या आठ ते दहा शब्द, आणि दहाव्या वर्षाच्या मुलाच्या प्रदीर्घ वाक्यांत बारा ते पंधरा शब्द दिसून आले.

**७ मजकुराचें स्वरूप व मांडणी :**— सातव्या वर्षाचें मूल पांच ते सहा ओळी लिहितें, व त्यांतील वाक्यें स्वतंत्र स्वरूपाचीं असतात. आठव्या वर्षाचें मूल निरनिराळीं वाक्यें जोडून लिहिण्याचा प्रयत्न करतें, परंतु तीं वाक्यें 'आणि व नंतर' यांसारख्या अव्ययांनीं जोडलेलीं — ठराविक ठशाचीं — वाक्यें असतात. नवव्या किंवा दहाव्या वयाचें मूल जास्त चांगल्या तऱ्हेनें लिहिण्याचा प्रयत्न करतें व त्याचीं वाक्यें तर्कशुद्ध रीतीनें एकमेकांना जोडून लिहिलेलीं असतात; त्याशिवाय वाक्यरचनेमध्येंहि कांहीं विविधता दिसून येते. पहिल्या-पहिल्यानें प्रत्येक वाक्याच्या आरंभीं नवीन नवीन कर्तृपद असतें. वयाच्या वाढीबरोबर वर्ण्य विषयाचें स्वरूपहि गुंतागुंतीचें होतें, व त्याचप्रमाणें वाक्यांची रचनाहि जास्त पद्धतशीर असते.

**८ शब्दयोजना :**—

**(अ) नामें व विभक्त्यन्त रूपें :**— सातव्या व आठव्या वर्षाचीं मुलें

नामांची प्रथमा, द्वितीया, तृतीया, षष्ठी व सप्तमी या विभक्तींचीं रूपें योजतात, आणि नवव्या व दहाव्या वर्षाचीं मुलें इतर विभक्त्यांचाहि उपयोग करतात. या मुलांना 'खेळणें' या धातुसाधित नामासारख्या शब्दांचीं निरनिराळ्या विभक्तींचीं रूपें योजतां येतात.

( आ ) सर्वनामें व विभक्त्यन्त रूपें :– सातव्या वर्षाचीं मुलें पुरुषवाचक सर्वनामांचा उपयोग निरनिराळ्या विभक्तींत करूं शकतात; आणि त्याहून जास्त वयाचीं मुलें संबंधी सर्वनामें व दर्शक सर्वनामें यांचाहि उपयोग सर्व विभक्तींत करूं शकतात.

( इ ) क्रियापदें व कृदन्त रूपें :– सातव्या वर्षाचीं मुलें क्रियापदांचीं रूपें वर्तमान, भूत व भविष्य अशा तीनही काळांमध्यें योजूं शकतात. 'ऊन' प्रत्ययान्त रूपांचा उपयोग आठव्या व नवव्या वर्षाचीं मुलें करूं लागतात, आणि 'गेलें पाहिजे, जातां येतें, जाऊं शकेल' अशा तऱ्हेच्या संयुक्त क्रियापदांचा उपयोग नवव्या व दहाव्या वर्षाच्या मुलांच्या लेखनांत दिसून येतो. आठव्या वर्षापासून क्रियापदांच्या विध्यर्थी रूपांचा उपयोग मुलांना करतां येतो.

( ई ) क्रियाविशेषणें :– सातव्या वर्षाचें मूल सामान्य तऱ्हेचीं कालवाचक व स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें योजतें. जसें – मग, आतां इकडे, तिकडे, वर, खालीं. आठव्या वर्षाचें मूल 'हळूहळू, पुनः, अशा रीतीनें' हीं क्रियाविशेषणें, नवव्या वर्षाचें मूल 'अर्धी, आजूबाजूस, तसेंच' हीं क्रियाविशेषणें, आणि दहाव्या वर्षाचें मूल 'अगोदर, एकसारखा, शिवाय, तीनदां' यांसारखीं अव्ययें योजतें.

( उ ) शब्दयोगी अव्ययें :– सातव्या वर्षाचें मूल 'वर, मध्यें, पासून, पुढें,' आठव्या वर्षाचें 'नंतर, मुळें', नवव्या वर्षाचें 'पर्यंत, कडे, प्रमाणें', आणि दहाव्या वर्षाचें मूल 'भोंवतीं, पैकीं' यांसारखीं शब्दयोगी अव्ययें योजूं शकतें.

**मुलांच्या लेखनासंबंधीं विस्तृत प्रमाणावर संशोधन करण्याची आवश्यकता** :–शालेय विद्यार्थ्यांच्या लेखनाचें पृथक्करण व वर्गीकरण करून ज्या

गोष्टी दिसून आल्या त्या वर दिलेल्या आहेत. अर्थात् फक्त चारशें विद्यार्थ्यांच्या लिखाणावरून काढलेले निष्कर्ष हे तात्पुरत्या महत्त्वाचेच समजले पाहिजेत. अशा तऱ्हेचें संशोधन जास्त विस्तृत प्रमाणावर व जास्त सखोल पद्धतीनें करण्यांत आल्याशिवाय निश्चित स्वरूपाचे सिद्धान्त प्रस्थापित करतां येणार नाहींत. तथापि वरील मर्यादित स्वरूपाच्या संशोधनावरून हें सिद्ध झालें कीं, मुलांच्या शब्दसंपत्तीचा परिणाम त्यांच्या लेखनावर पुष्कळ होत असतो. म्हणूनच विद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तीचा आढावा मधून मधून घेणें आवश्यक आहे. मुलांच्या शब्दसंग्रहांत उपयुक्त व विविध स्वरूपाचे शब्द असल्याशिवाय, त्यांना आपल्या लेखनांत एकसूत्रता व वाक्यप्रयोगांची विविधता आणतां येणार नाहीं, व या गोष्टींशिवाय विद्यार्थ्यांचें भाषाप्रभुत्व सिद्ध होणार नाहीं. याकरितां विद्यार्थ्यांचा शब्दसंग्रह हळूहळू वाढवण्याकरितां पुढीलप्रमाणें प्रयत्न करण्यांत आले पाहिजेत. सोपें सोपें वाङ्मय त्यांना वाचावयास दिलें पाहिजे, विविध विषयांवरील उपयुक्त माहिती संभाषणद्वारा दिली पाहिजे, नवीन वस्तूंचें बारकाईनें निरीक्षण करण्यास शिकविलें पाहिजे, प्रत्येक नवीन गोष्टीविषयीं 'कां व कसें' हें समजण्याचा प्रयत्न करण्यास लावलें पाहिजे; आणि शेवटीं भाषणद्वारा व लेखनद्वारा आत्माविष्कार करण्यास उत्तेजन दिलें पाहिजे. असें केलें तरच विद्यार्थ्यांचा शब्दसंग्रह : विविध स्वरूपाचा होऊन त्यांना त्याचा नीट उपयोग करतां येईल.

निरनिराळ्या वयाच्या विद्यार्थ्यांच्या लेखनासंबंधीं संशोधन करणें ही बाब संशोधकांचें लक्ष वेधण्याइतकी स्वतंत्रतया महत्त्वाची आहे व अशा तऱ्हेचें संशोधनकार्य प्रस्तुतच्या शब्दसंपत्तिसंबंधीच्या संशोधनानंतर हातीं घेतलें जाणें इष्ट आहे, अशी अपेक्षा केल्यास अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटतें.

# प्रकरण सातवें

# उपसंहार



मस्तुत संशोधनाचें मर्यादित स्वरूप – निरनिराळ्या ठिकाणीं अशाच स्वरूपाच्या चौकशीची आवश्यकता :– प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांच्या मराठी भाषाज्ञानाला मूलभूत असणारी जी शब्दसंपत्ति तिच्या वयोवार वाढीसंबंधी मी केलेलें प्रस्तुत संशोधन हा एक त्या बाबतींतील अल्पसा प्रयत्न आहे. मराठी भाषा बोलणारे लोक केवळ मुंबई प्रांतांतच नव्हे, तर मध्यप्रांत व व वऱ्हाड या प्रांतांतहि फार मोठ्या प्रमाणावर पसरलेले आहेत. तेव्हां एवढ्या विस्तृत प्रदेशांत पसरलेल्या मराठी भाषा बोलणाऱ्या मुलांची शब्दसंपत्ति वयोवार कशी वाढत जाते हें ठरविणें माझ्यासारख्याला जवळ जवळ अशक्य असल्यामुळें,

स्वतंत्रतया पूर्ण स्वरूपाचें केंद्र असलेल्या मुंबई शहरापुरतेंच संशोधन करावें असें मीं ठरविलें.

पांच ते नऊ वर्षे वयाच्या विद्यार्थ्यांचा शब्दसंग्रह केवढा असतो हें शक्य तितक्या पूर्णतेनें ठरविण्याचा मी प्रयत्न केला आहे. परंतु अशा तऱ्हेचें संशोधन हें मराठी भाषेसंबंधी तरी पहिलेंच असल्यामुळें, संशोधनपद्धतीची रूपरेषा विश्वविद्यालयनियुक्त अध्यापकांच्या संमतीनें ठरवावी लागली, कारण अशा प्रकारच्या संशोधनाला मार्गदर्शक होईल अशी नक्की माहिती आम्हाला तरी उपलब्ध झाली नाहीं. त्याचप्रमाणें प्रस्तुत शब्दसंग्रहाची तुलना पूर्वीच ठरविलेल्या अशा एखाद्या अधिकृत मराठी शब्दसंग्रहाबरोबर करतां आली नाहीं. शिक्षणशास्त्रांतील संशोधनाकडे अगदीं अलीकडेच बरेंचसें लक्ष पुरविण्यांत येऊं लागलें आहे; व त्यामुळें संशोधनाची आवड असणाऱ्या विद्यार्थ्यांचें लक्ष या गोष्टीकडे वेधलें आहे. म्हणून परस्पर सहकार्यपद्धतीनें निरनिराळ्या मराठी विभागांतील अधिकारी संशोधक ज्या वेळीं असे बरेच प्रयत्न करतील, त्या वेळीं प्रस्तुत वयोवार शब्दावल्यांना विश्वसनीयता व खरेपणा या दृष्टींनीं स्थिरता येईल. नंतर या शब्दसंग्रहांच्या आधारें योग्य स्वरूपाचें वाङ्मय निर्माण झाल्यावर साक्षरताप्रसाराच्या कार्याला जोराची चालना मिळेल.

*देहातील वाचनालयांची आवश्यकता* :– योग्य तऱ्हेच्या शब्दसंग्रहांवर आधारलेल्या वाङ्मयाच्या निपजेनेंच सर्व कार्यभाग साधणार नाहीं. प्रतिदिनीं संख्यादृष्ट्या वाढणाऱ्या वाचकवर्गाची वाचनाची भूकहि शमविली पाहिजे, कारण नवीनच साक्षर झालेल्या मुलांच्या अथवा प्रौढांच्या मनांतील वाचनोत्सुकता जिवंत ठेवली पाहिजे. हें कार्य समाधानकारक होणें ही गोष्ट फक्त वाचनालयांच्या द्वाराच शक्य आहे. निरक्षर लोकांची अजस्र संख्या कमी व्हावी म्हणून प्रयत्न करण्यांत येत असून, त्यासाठीं योग्य मार्ग व साधनें हुडकलीं जात आहेत. या सर्व प्रयत्नांचा नैसर्गिक परिणाम असा होईल कीं, नवशिक्षित शेतकरी किंवा कामकरी यांना आवडतील अशा सोप्या सोप्या पुस्तकांनीं युक्त अशा वाचनालयांबद्दल जोराची मागणी येईल.

